







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# दीपावली

नव महाराष्ट्र-गौरव पुरवणी •

वर्ष २० वें, मे '६४ •

मूल्य १ रु. •



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास







महाराष्ट्र राज्य वर्धापन दिन;
मे १९६४ : मूल्य १ रु.

# दीपावली

साहित्य • कला • संस्कृति

## श्रीयनामावलि—



- 'गोविंद बल्लाळ देवल' या श्री. व. शां. देसाईंच्या लेखांतील श्री. देवल व कै. अण्णासाहेब किर्लोस्कर यांचीं दुर्मिळ छायाचित्रें 'मराठी रंगभूमि' या आगामी चित्रपटांतील चित्रसंग्रहामधून दिग्दर्शक श्री. के. टी. देशमुख ह्यांनीं दिलीं आहेत त्यावद्दल त्यांचे आभारी आहोंत.

टे. नं. ७७७६५
Gram : DALALART



दलाल आर्ट स्टूडिओ • ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

※ संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु.+ रजि. पोस्ट ५५ न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेली मतें हीं चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.


अनुक्रमणिका











**दलाल आर्ट स्टूडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४,

टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART


● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडिओच्या नांवें, मुंबई वँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या वँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यत: कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.


संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ** दलाल यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# खऱ्या अर्थानें 'संयुक्त' महाराष्ट्र राज्य चिरायु होवो !

**सलग** संयुक्त महाराष्ट्राचें स्वप्न साकार होऊन चार वर्षे पूर्ण झालीं. महाराष्ट्राचें आतां आनंदवनभुवन होणार असा आशावाद तेव्हां अनेकांनीं प्रगट केला. पण प्रत्यक्षांत या आनंदाचा अल्पसा तरी शिडकावा कुणाच्या मुखावर झालेला दिसत आहे का ? वाढत्या महागाईनें सर्वांचीं मनें नुसतीं पोळून निघालीं आहेत. महागाई वाढली पण महागाईभत्ता वाढला नाही ही सर्वांची ओरड आहे. एस्. टी. वंद करून महाराष्ट्रांतल्या दळणवळणास खीळ घालण्याची धमकी त्या कामगारांनीं दिली होतीच. 'तुम्ही भावी पिढीचे शिल्पकार, वागणुकीचा आदर्श तुम्ही मुलांना घालून दिला पाहिजे' असें सांगून ज्यांचीं तोंडें वंद करण्यांत येतात, ते शेळपट शिक्षकसुद्धा 'सी' एरियाचा भत्ता न मिळाल्यास संपावर जाऊं अशी भाषा वोलू लागले. पण या असंतोषाची अखेर इथेंच व्हायची नाहीं. धान्याचीं गुदामें लुटून त्यांतलें धान्य लोकांना वाटून देण्याची मोहीम प्र. सो. पार्टीनें उघडलीय. विनोवांनी परवां रास्त इशारा दिलाय् : 'कम्युनिझमचें उत्तर सीमेवरचें आक्रमण आपण एकवेळ रोकू शकू पण इकडे जनतेच्या मनांत त्याचीं पाळेंमुळें खोलवर रुजत जायची भीति आहे.'

अन्न, वस्त्र व निवारा माणसाच्या प्राथमिक गरजा आहेत. त्या एकदा भागविल्या गेल्या की संगीत-साहित्य-कला इत्यादि संस्कृतीच्या शाखा जोराने फोफावतील. पण असें सुस्थिर व स्वस्थतेचें वातावरण नाहीं म्हणून या वावतींतला उत्साह थंडावलाय का? मुळीच नाहीं. यंदाचें साहित्यसंमेलन गोव्याला होणार हें कळल्यापासून तर लोकांची धावपळ केव्हांच सुरू झालीय. गोमंतकीय लेखकांच्या गोमांतकाच्या पार्श्वभूमीवरच्या कादंबऱ्या 'प्रादेशिक प्रादेशिक' म्हणून गाजल्या आहेत. त्यांतल्या निसर्गाच्या वर्णनांनीं लोकांचें कुतूहल केव्हांच जागृत केलें आहे. अनेक लेखक, चित्रकार व संगीतकारांमध्यें सौंदर्यशोधाची प्रेरणा निर्माण करणारी त्यांची ही जन्मभूमी आहे तरी कशी याचें औत्सुक्य सर्वांना आहे. त्याच्या जोडीला 'माझ्या गोव्याच्या भूमींत' ही कविता बोरकरांनीं लिहून ठेवलेली आहे. गोव्याचें हें गाईड एका हातांत घेऊन फणस, सुपारी वगैरे एकेक नग ही मंडळी आता तपासून पहाणार.

संमेलनाला अध्यक्षहि लाभलेत क्रांतीचा जयजयकार करणारे कवि कुसुमाग्रज. गोव्याच्या भाषिक वादावावत त्यांची केव्हांपासूनच ठाम भूमिका आहे. 'दिल्लीकरांच्या दरवारांत कधीं होईल तें होवो पण सरस्वतीच्या दरबारांत गोव्याचें एकीकरण महाराष्ट्राशी केव्हांच झालें आहे' अशी घोषणा त्यांनीं त्यांच्या नाशिकला झालेल्या पहिल्या सत्काराच्या वेळीं केली ती दिल्लीकरांच्या कानावर गेली कीं नाहीं ? आपल्या भूमिकेचें समर्थनहि शिरवाडकरांनी मोठ्या मार्मिकपणें केलें आहे. तें असें कीं गोव्यांतल्या साहित्यिकांनीं साहित्याच्या क्षेत्रांत जी कांहीं निर्मिति केली आहे ती प्रामुख्याने मराठी भाषेंतूनच.

साहित्यिकाच्या व्यक्तिमत्त्वाची घडण समाजाच्याच संदर्भात होते. समाजातल्या निरनिराळ्या व्यक्तींशीं, विचारांशी व कल्पनांशीं त्याचे जे संवंध असतात त्यांतूनच लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाला आकार लाभतो. राजकीय, धार्मिक, नैतिक वगैरे समाजाच्या निरनिराळ्या क्षेत्रांत जी आंदोलनें उठतात त्यांचा लेखक हाहि एक साक्षी असतो. परिणाम असा कीं समाजमानसाचें प्रतिविंब साहित्याच्या आरशांत स्पष्टपणें उमटतें. तेव्हां गोव्यांतल्या साहित्यिकांची मराठी निर्मिति हा एक प्रकारें जनतेचाच कौल ठरवायला हवा.

ह्या विलीनीकरणाला ख्रिश्चनांचा विरोध आहे. असें पं. नेहरूंचें म्हणणें. पण असें फुटून निघणें भारतीय घटनेला कितपत धरून आहे ? भावनात्मक एकतेचें ध्येय गांठण्यासाठीं एक स्वतंत्र समिति स्थापन करणाऱ्या सरकारच्या धोरणाशींहि ही गोष्ट विसंगतच आहे. 'गोव्याचें जें कांहीं वैशिष्टयपूर्ण व्यक्तिमत्त्व आहे त्याची जपणूक होणार नाही' अशी भीति तरी का व्यक्त केली जावी ? हाच विचारप्रवाह चालू राहिला तर आणखी एक पोर्तुगीजस्तान मात्र भारतांत निर्माण व्हायचें.

महाराष्ट्र शासन ह्या एकीकरणावावत कितपत प्रयत्नशील आहे ? संयुक्त महाराष्ट्र निर्माण होण्यापूर्वी ज्या मुत्सद्देगिरीनें पावलें श्री. चव्हाणांनीं टाकलीं त्याचा आदर्श ह्यावेळीं महाराष्ट्रानें अवश्य ठेवावा. संयुक्त महाराष्ट्राप्रमाणेंच गोवा महाराष्ट्रांत येण्याचें हें स्वप्न लवकरच साकार होवो अशी इच्छा याच शुभदिनीं प्रकट करतो.

**––संपादक**


अनुक्रमणिका










पु. भा. भावे

**महाराष्ट्राच्या वीरांनी अटकेपार झेंडे पूर्वीं लावले आहेत. त्या वेळच्या युद्धाचीं स्फूर्तिदायक वर्णनें बखरकारांनीं जागोजाग केलेलीं आढळतात. प्रत्यक्ष रणभूमीवर जाण्याचें भाग्य बखरकारांना कितपत लाभें कोण जाणे; पण महाराष्ट्राच्या पांच साहित्यिकांना मात्र युद्धभूमीचें दर्शन घेण्याचा योग गेल्या ऑक्टोबरांत आला. हा मान भारतांत फक्त महाराष्ट्राला मिळाला. पर्यायानें हा महाराष्ट्राचाच गौरव होय. 'दीपावली' शीं जिव्हाळ्याचे संबंध असलेले श्री. पु. भा. भावे हे त्यांतलेच एक. त्यांच्यासारख्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाच्या देशप्रेमी लेखकाच्या या प्रवासांत काय प्रतिक्रिया झाल्या तें करून घेण्यास सर्वजण उत्सुक असणार. त्यांचें हें प्रवासवर्णन 'दीपावलीं'तून या अंकापासून क्रमशः प्रसिद्ध होत आहे.**

**दिनांक** २१ ऑक्टोबर ६३ ला सूर्य माथ्यावर येण्यापूर्वी आमचें विमान आकाशांत चढलें आणि दिल्लीच्या दिशेनें झेपावूं लागलें, खाड्या, टेकड्या रानें आणि शेतें ह्यांचा पट उलगडूं लागला. नद्या ओहोळा-सारख्या दिसूं लागल्या. घरें ठोकळ्यासारखीं झालीं. माणसांना मुंग्यांचा आकार आला. आणि विमान अधिक वर चढलें तसें भुई-वरच्या माणसांना अस्तित्वच उरलें नाहीं. आमचा आकाशाच्या राज्यांत प्रवेश झाला. खिडकीच्या कांचेशीं चेहरा लावून मीं पहात होतों. येवढें अवाढव्यपणें पसरलेलें मुंबई नांवाचें तें महानगर एकदम संकोच पावलें व अदृश्य झालें. माझ्या देशाची भूमि माझ्या डोळ्याखालून सरकूं लागली. तिचें एक वेगळेंच रूप अवकाशाच्या खिडकींतून मी पहात होतों. सांडलेल्या पाण्यासारखें जलाशय जागोजाग चमकत होते. गर्द रानें हिरव्या रंगाचे ठिपके सांडल्यासारखीं दिसत होतीं. आकाशांतल्या त्या उंचीवरून केवढेंतरी सौंदर्य माझ्या डोळ्यांत सामावून जात होतें. हें विविधरंगी व विराट् सौंदर्य माझ्या मातृदेशाचें होतें. तो मातृदेश मूर्तिमंत ह्या अवकाशयानांतून मी पहात होतों.

शाळेंतल्या भिंतीवर लहानपणीं देशाचीं मानचित्रें मीं पाहिलीं होतीं. उंचसखल भागाच्या प्रतिकृति पाहिल्या होत्या. समुद्र-किनारा दंतुर असतो, नदीच्या मुखाशीं त्रिभुज प्रदेश निर्माण होतो, असें पाठ केलें होतें. पण तेव्हां तें मला खरें वाटलें नव्हतें. आतां कलाबतूसारख्या झगमगणाऱ्या नद्यांचीं वळणें वाकणें मी प्रत्यक्षच पहात होतों. त्या नद्या समुद्रांत विसर्जित होत असल्याचें पहात होतों. समुद्राचा किनारा दंतुर असल्याचें जागोजाग मला दिसत होतें. एकंदरींत शाळेंतलीं तीं मानचित्रें खोटें बोललीं नव्हतीं. त्यांनीं वर्णन केल्या-प्रमाणेंच माझा देश होता.

माझा देश अफाट विस्ताराचा होता. त्यांत कितीक प्रकारचें सौंदर्य होतें. अनेक रंगछटांचीं माणसें होतीं व अनेक रंगछटांचीं फुलें होतीं. ह्या देशांत दाट अरण्यें होतीं व उंच उंच पर्वत होते. हा प्राचीन व पुरातन भारतवर्ष होता. इतिहासाचीं पावलें येथें जागोजाग उमटलीं होतीं. अनेक साम्राज्यांचे व सत्ताधीशांचे उदयास्त ह्या देशाने पाहिले. अनेक विद्या, शास्त्रें व कला येथें पल्लवित झाल्या व परमोत्कर्षास गेल्या. अनेक तत्त्वविचारांना व धर्ममतांना ह्या भूमिनें जन्म दिला. त्या भूमीचेंच आकाशदर्शन ह्या क्षणीं मी घेत होतों. मला तें कांहीं खरेंच वाटेना. त्या विराट् दर्शनानेहि क्षणभर मला भ्रमल्यासारखें झालें व मीं अंत पाहिलें.

माझे चार साथीदार गप्पांत व पान-तमाखूंत रंगलेले होते—धुराचे फवारे सोडीत होते. दोन वसंत, दोन पुरुषोत्तम व एक गजानन अशी पंचकडी प्रवासास निघाली होती. मुंबई—पुण्यांत जमावयाची ती बैठक अंतराळांत जमली होती. आम्ही भारताच्या उत्तरसीमेकडे निघालों होतों. लडाख हें आमचें लक्ष्य होतें. दिल्ली हा आमच्या प्रवासाचा पहिला टप्पा होता. एका संस्मरणीय यात्रेचा हा प्रारंभ होता. महाराष्ट्र

शासनाच्या वतीने व संरक्षण विभागाच्या सहाय्यानें पांच मराठी लेखक चीनी आक्रमण झेलणाऱ्या लडाखच्या रणभूमिकडे निघाले होते. लेखण्या तलवारींची भेट घेण्यास सरसावल्या होत्या. अनेक दृष्टींनीं हा योग अपूर्व होता.

चीनी आक्रमण चालू झालें तेव्हां मी पुण्यांत होतों. पुण्याच्या रहिवासांत माझा व श्री. माडगूळकरांचा सायंकालीन फेरफटका निघाला नाहीं असा दिवस क्वचित् जातो. बैठक रंगली नाहीं, हास्यविनोदाचे पूर लोटले नाहीत असेंहि सहसा घडत नाहीं. पण चीनचें विश्वासघातकी आक्रमण सुरू झालें, पराजयाच्या वार्तामागून वार्ता येऊं लागल्या व आमच्या बैठकींचा रंग उडाला. तोंडें कडूशार झालीं. दिवसचे दिवस उदासवाणे जाऊं लागले. चालणें मैलोगणतीं होत होतें पण बोलणें बंद पडलें. मन विचारांत चूर होतें.

लेखक व कलाकार शेवटीं देशांतच राहतात. देशाचें ते कांहीं देणें लागतात. देशच बुडाला तर साहित्याला व कलेला काय जाळावयाचें आहे ? परदेशी लेखक व वार्ताहर आघाडीवर जातात. युद्ध प्रत्यक्ष पाहतात, मग युद्धाविषयीं लिहितात. त्यांच्या शासनसंस्था त्यांना सन्माननीय अधिकारपदें (Honorary Commissions) देतात. आपल्याहि बाबतींत असेंच कांहीं कां घडूं नये ? आपणहि रणांगणावर कां जाऊं नये ? चीनी आक्रमण हीं एका दृष्टीनें आपत्ती असली, तर दुसऱ्या दृष्टीनें पर्वणी होती. अठराशें सत्तावननंतर प्रथमच आज हिंदुस्थान सशस्त्र संघर्षास सिद्ध होत होता. झोटिंगवादाला तोंड देण्यासाठीं भारतीय देशभक्ति व हिंदुस्थानी पराक्रम आधुनिक काळांत आज प्रथमच उभा होत होता. तो पराक्रमाचा व देशभक्तीचा सोहोळा आपण प्रत्यक्षच कां पाहूं नये ? येथें उगाच बोलत, भटकत व जीव खात कां बसावें ? रणभूमीवरच आपण कां जाऊं नये ? लेखणीला संगिनीची जोड कां देऊं नये ? असेच कांहीं विचार मनांत येत होते. तोंडावाटें उमटत होते. लडाख-नेफाचा संगरग्रस्त प्रदेश डोळ्यापुढे तरळत होता. मन तिकडे धांव घेत होतें. डोळे युद्धभूमीचीं स्वप्नें पहात होते.

तीं स्वप्नें आज साकार होण्याच्या मार्गावर होतीं. तूर्त विझल्यासारख्या दिसणाऱ्या रणभूमीच्या दिशेनें आम्ही पांच लेखक निघालों होतों. पांच लेखकांचें ह्या रीतीनें एकत्र येणें एरवीं कठीणच पण एका हेतून आज आम्ही एकत्र आलों होतों. आम्ही एकत्र आलों आणि तत्काळ एकरूप होऊन गेलों. ग. दि. माडगूळकर आणि पु. ल. देशपांडे ह्यांचा आणि माझा परिचय निदान गेल्या वीस वर्षांचा तरी होता. वसंत सबनीसांनाहि मी गेलीं कांहीं वर्षे ओळखत होतों. पण वसंतराव कानेटकरांची आणि माझी प्रत्यक्ष ओळख, प्रयाणाच्या आदल्या रात्रीं आम्ही एम्. एल्. ए. होस्टेल मध्यें एकत्र आलों तेव्हांच झाली. आम्ही दोघेच तेथें रहिवासांत होतों व तेवढ्यांत त्यांचे आणि माझे आकडे पटले. आम्हां सगळ्यांचे आकडे इतके पटले की हा प्रवास संपेपर्यंत तोंडें पांच पण माणूस एक अशी आमची अवस्था झाली.

त्या प्रवासाचा हा आरंभ होता. मराठींतले पांच लेखक एका दिशेनें व एका मार्गानें चालले होते. कांहीं नांव गाव असलेले हे लेखक होते. एरवी घाईगर्दींत असणारीं हीं माणसें होतीं. इच्छा असूनहि इतक्या निवांतपणें त्या साऱ्यांनीं एकत्र येणें ही कठीण गोष्ट होती. पण दैवयोगानें तरी ती गोष्ट घडली होती. कल्पनेच्या आकाशांत विहार करणारे लेखक खऱ्या आकाशांतून एकत्रितपणें चालले होतें. बसल्या जागीं बैठक रंगत होती. पण मला मोह पडला तो खिडकीचा. लहानपणीं मी आगगाडीतल्या खिडकीसाठीं धडपडत असे. त्यानंतर धडपडून खिडकी गाठली ती आज. खिडकी वस्तुतः माडगूळकरांची होती. पण माझा बालसुलभ उत्साह पाहून त्यांनीं ती मला बहाल केली. कानिटकर सबनिसांप्रमाणेंच हा माझा विमानाचा पहिला प्रवास होता. माडगूळकरांनीं आकाशसंचार केलेला होता. आणि देशपांड्यांनीं तर आकाशयानांतून जगाला प्रदक्षिणा घातलेली होती. उडणारें विमान आणि उडणारा पतंग सारखाच वाटावा इतका त्यांचा ह्या विषयाचा सराव होता.

अधांतरीं उडणें हा प्रकार मला मात्र सर्वस्वी नवखा होता. म्हणून ह्या वयांतहि मला त्याचें कौतुक वाटत होतें. कुतूहलाने मी देशपांड्यांना वायुविद्याविषयक प्रश्न विचारीत होतों. आणि ते अधिकारवाणींतून मला उत्तरें देत होते. कधीं कधीं त्यांचीं उत्तरें ऐकून मी अधिकच बुचकळ्यांत पडत होतों. पण श्री. पु. ल. देशपांडे येवढेंच माझ्या प्रश्नांचें लक्ष्य नव्हतें. पांथांच्या सेवेसाठीं विमानाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत धावपळ करणाऱ्या एका वायुसुंदरीवर देखील मी प्रश्नांचा मारा चालविला होता. पेपरमिंटासारख्या खाऊचें तबक घेऊन ती समोर आली की मी तिच्या तबकांत एखादा प्रश्न टाकीत असे. माझे प्रश्न सामान्यतः भौगोलिक असत. ही नदी कोणती ? .... तो डोंगर कोणता ? ... तें खालीं दिसतें आहे तें कुठलें गांव ? ... अशा स्वरूपाचे ते प्रश्न होते. ह्या प्रश्नांचीं उत्तरें तिला मुखपाठ असावींत अशी माझी कल्पना होती. शेकडों वेळां ती ह्या भूप्रदेशावरून येरझारा करीत असेल. इच्छा नसली तरी तिला किती तरी गोष्टी ठाऊक असावयास पाहिजे होत्या. पण तशांतला प्रकार दिसला नाहीं.

"ही नदी कोणती" ह्या माझ्या पहिल्या प्रश्नाला सुकाणू वरून समोर बसलेल्या नायकाकडे धांवत जाऊन तिनें उत्तर मिळवून आणलें व मला सहास्य मुखानें सांगितलें : 'दॅट इज द रिव्हर टॅप्टी' (ती तापी नदी). पण सहास्य मुखाचा व तत्परतेचा आविर्भाव जवळजवळ येथेंच संपला. मी पुन्हा प्रश्न विचारले तेव्हा थोड्या कष्टानें तिनें पुन्हा उत्तरें मिळवून आणलीं. पण माझे प्रश्न वाढत चालले तेव्हां तिचा त्रासिकपणा वाढत चालला. सहास्य मुख निर्हास्य झालें. माझें तिनें नांवच टाकलें-फुकाचे पेपरमिंट मिळण्याची मारामार झाली, तिथें उत्तरें कसलीं मिळतात !

हा प्रकार माडगूळकर-देशपांड्यांच्या



अनुक्रमणिका

व्यानीं आला. देशपांड्यांना अन्य देशाचे दाखले आठवले. तेथें म्हणे असें होत नाहीं. विचारणारा तृप्त होईल, इतकें एकेका महत्त्वाच्या स्थळाविषयीं सांगितलें जातें. सांगणाऱ्याला अर्थात् तें ठाऊक असतें. युरोप फिरून आलेले माझे बंधूहि असेच कांहीं सांगत होते. पण लंकेंत सोन्याच्या विटा. इथला प्रकार न्याराच होता. माझ्या कुतूहलाच्या मस्तकांत त्या आकाशअंगनेनें तटस्थतेची कीट घातली. तिला माझा त्रास वाटला. ब्रिटन, जपान, जर्मनीसारख्या परदेशाशीं तिचा संबंध केवळ तापी नदीला "टॅप्टी" म्हणण्यापुरता. जड जिभेचा साहेब आमच्या सुंदर नद्या नगरांचीं नांवें वेडीं-वाकडीं वळवून उच्चारतो म्हणून तीहि तसें करीत होती. परंतु आमच्या पर्वत-नद्या-नगराविषयीं अधिक आपुलकी तिला नव्हती.

ह्या वस्तूविषयी अधिक ओढ दाखविली परकीयांनीं. त्यांनीं सहस्त्रावधि क्रोशांवं पालथे घालून आमच्या गौरीशंकराची गांठ घेतली. नील नदीचा उगम शोधून ते गेले. घनदाट आफ्रिकेंत प्रवेश त्यांनीं केला. पार दक्षिण ध्रुवावर स्वाऱ्या त्यांच्या झाल्या. फार काय सांगावें, आमचें वेरूळ, अजंठाहि घासून पुसून त्यांनींच आमच्या स्वाधीन केलें. पराक्रमी कुतूहलापायी त्यांनीं जग जिंकलें. आणि उत्सुकतेचीं कवाडें मिटून आम्ही उंबऱ्याआड झालों. आमच्या देशाचीहि ओळख आम्हांस पुरती नाही, तेथें परदेशाचें नांव कशाला. असेच कांहीं विचार घोळवीत मी गप्प झालों.

गप्प होणें भागच होतें. भुईवर असतों तर कोठें काय आहे ह्याची चार जणांजवळ चवकशी केली असती. येथें मी वायुयानांत बंदिस्त होतों. कोणतें काय म्हणून मनांत प्रश्न उमटतो न उमटतो तों दुसरेच कांहीं डोळ्याखालीं येत होतें. तेंहि झपाट्यानें निघून जात होतें. जिज्ञासा तशीच मनांत मरून चालली होती. ही मही असेल ही नर्मदा असेल, हा विंध्याद्रि असेल, असे नुसते मी मनाशी आडाखे बांधत होतों. हिंदुस्थानचें मानचित्र नुसतें मनोमन डोळ्यासमोरून सरकावीत होतों. नर्मदा मी बरोबर ओळखली. "ही नदी नर्मदा काय ?" म्हणून कोडगेपणाने क्रमांक दोनच्या वायुसुंदरीस मी प्रश्न केला. तिने होकार दिला. आणि ती दूर सटकली. पुन्हा शांतता नांदू लागली. मी कांचेंतून खालीं पहात राहिलों. खालीं धरणी सरकत होती. देखावे पालटत होते. पण कोणता देखावा कुठला हें निश्चित कळत नव्हतें. भुईवर असतांना तत्काळ शहानिशा करून घेतली असती.

पायपीट करण्याची मला आवड आहे कुठल्याहि नव्या गांवांत गेलों की प्रथम मी त्यागांवच्या भूमीला पादाक्रांत करतों. पाहण्यासारखें व न पाहण्यासारखेंहि सारें पाहून टाकतों. पाहण्यासारखें कांहीं ना कांहीं प्रत्येक ठिकाणी बहुधा मला सांपडतें. मग तें गांव कोंकणातलें गुळसुंदें असो कीं आंध्रप्रदेशांतील रामप्पा असो. पण इथें माझा उपायच खुंटला होता सहस्रावधि फुटांवर आकाशांत मी माझ्या आसनाशी खिळलेला होतो, व स्तब्धपणें कधी आकाशांत तरंगणाऱ्या ढगांकडे तर कधीं खालच्या धरणीकडे पहात होतों. तेवढ्यांत त्या आकाशयानांत पहिली व शेवटची ज्ञानदायक पुकार घुमली.

"आतां आपण जयपूर नगरावरून उड्डाण करणार आहोंत."

ते शब्द ऐकतांच माझें शरीर मरारलें. जयपूर! राजस्थान! तर मग मी ज्या डोंगराच्या ओळी पाहिल्या त्या अरवली पर्वताच्या होत्या म्हणायच्या. हळदीघाटाचा अरवली ! राणा प्रतापचा अरवली ! तर मग राजस्थानच्या वीरभूमीवरून आमचा प्रवास चालू होता म्हणायचा. बाप्पा रावळाचें आणि हमीरचें राजस्थान ! राणा संगाचें व युवराज चोंडाचें राजस्थान ! मीरेचें, पद्मिनीचें, कृष्णाकुमारीचें राजस्थान !

राजस्थानची माती दिसतांच माझ्या वृत्ती उचंबळून आल्या. ग्रीकांनीं पारसिकांशीं थर्मापिलीच्या खिंडींत– मूठभर माणसांनिशी सामना दिलेल्या उग्र लढ्याविषयी आपण वाचतों. पण टॉड म्हणतो की राजस्थानांत अशी एक खिंड नाहीं, की जी थर्मापिलीच्या धीरोदात्त धैर्यानें



**आपल्या विनोदी लेखनानें सर्व महाराष्ट्राच्या ओळखीचे झालेले व ज्यांचे विनोदी लेख हें 'दीपावली'चे प्रमुख आकर्षण असतें त्या जयवंत दळवींच्या 'चक्र' या कादंबरीला महाराष्ट्र सरकारचें प्रथम पारितोषिक मिळालें आहे. 'दीपावली' तर्फे त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन.**

**युनायटेड स्टेट्स इन्फर्मेशन सर्व्हिसमध्यें प्रकाशन विभागाचे दळवी प्रमुख आहेत. प्रतिष्ठा, नांवलौकिक, संपत्ति या गोष्टी त्यांना प्राप्त होण्यांत दैवाचा कांहीं भाग असला तरी कर्तृत्वाचा वाटा अधिक मोठा आहे. त्यांची अनेक वर्षांची तपश्चर्या त्या मागें उभी आहे. निरनिराळ्या वृत्तपत्रांत काम करतांना सर्व थरांतलें जीवन त्यांनीं जवळून पाहिलें आहे. आणि तेंहि केवळ खुसखुशीत बातमी शोधणाऱ्या बातमीदाराच्या दृष्टीनें नव्हे तर अभिजात लेखकाच्या उत्कट संवेदनाक्षमतेनें. ह्या अनुभवांना शब्दरूप देण्याची किमयाहि त्यांच्याजवळ आहे. टेक्निकल केमिस्ट्री, डाइंग अँड ब्लीचिंग हा विषय घेऊन चार वर्षें व्ही. जे. टी. आय् मध्यें वायां घालवून हा गृहस्थ अखेर मानवी स्वभावाचे विविध रंग निरखण्यांतच दंग झाला. माणसें तर त्यांना नेहमींच हवीशीं वाटतात. त्यांच्या स्वभावाचे विविध बारकावे टिपून आपल्या साहित्याचें अजब रसायन ते सिद्ध करतात. हें रसायन कधीं स्फोटक असतें, कधीं दाहक असतें तर कधीं हास्यवायुसारखें खदखदून हंसवणारें. त्यांचें अष्टपैलू व्यक्तिमत्त्वच नेमकें त्यांतून प्रकट होतें. लघुकथा, व्यक्तिचित्रें, एकांकिका, कादंबरी वगैरे वाङ्मयप्रकार सारख्याच सफाईनें हाताळणाऱ्या दळवींचा खरा पिंड अस्सल विनोदी लेखकाचा आहे.**

**त्यांची नवी लेखमाला लवकरच 'दीपावली'तून प्रसिद्ध होईल.**

लढविली गेली नाही. अशी तसूभर भूमि नाही कीं जिने कुठलें ना कुठलें थक्क करणारें वीरकृत्य पाहिलें नाहीं. अंबारींत बसलेल्या युवराज सेलीमवर प्रतापचा भाला जेथें सणसणत गेला तें हें राजस्थान. झालाचा ठाकूर मान आपल्या स्वामीसाठीं जेथें बळी गेला, तें हें राजस्थान. औरंगजेबाला पाणी पाजून दक्षिणेकडे पिटाळणारा राजसिंह जेथें जन्माला आला तें हें राजस्थान. पद्मिनीचें व दुर्गादासाचें राजस्थान ! सतीचें व शूरांचें राजस्थान !

कुठें आहेत ? कुठें आहेत तीं सारीं माणसें? क्षणभर मला वाटलें कीं असेंच खाली त्या राजस्थानच्या पुण्यभूमीवर उतरावें, आणि ओरडून म्हणावें, कुठें आहांत तुम्ही सारे ? आमच्या सहाय्याला या ! तुमचें तें उग्र चारित्र्य आम्हांला द्या ! तुमचें शौर्य आम्हांला द्या ! तुमची निष्ठा द्या, तुमची समर्पणबुद्धी द्या ! पुन्हा आज भारतावर आक्रमणाची छाया पडली आहे. आम्हांला तुमच्या वीरवृत्तीची आवश्यकता आहे !

रजपूत इतिहासांतील प्रसंगामागून प्रसंग माझ्या डोळ्यापुढून जात होते, व मन भिरभिरत होतें. काळाचें मला कौतुक वाटत होतें. राजस्थानची भूमि तीच होती, पण माणसें किती पालटली होतीं, त्यांची वृत्ति किती पालटली होती. संघशः माणसानें काहीं प्रगति देखील केली होती. ह्या इथे ह्या अवजड विमानांत बसून मी आकाशांतून तरंगत होतों. खालीं राजस्थान होतें, अनेक आरशांच्या तुकड्यांनीं सजविल्याप्रमाणें तें अनेक जलाशयांनीं झळकत होतें. सारेंच राजस्थान कांहीं वाळवंट नव्हतें. आणि हें आतांच गेलेलें जयपूर तर इतक्या उंचावरून देखील किती रेखीव दिसत होतें. जयपूरच्या रेखीवपणाविषयी मी अनेकदा वाचलें होतें आणि जयपूरचें निसटतें दर्शन ह्या येथून घेत होतों.

ह्या भूमीचें असेंच दर्शन पुरातनकाळी कुणी कधीं घेतलेंच नसेल का ? मग रावणवधानंतर सीतेसह रामाने केलेल्या "पुष्पक" प्रवासाचें काय ? ती केवळ कविकल्पना कां म्हणून मानायची ? धरणीतलावर अवतरलेली आमची पिढी तेवढी सर्वात अधिक कर्तृत्ववान व बुद्धिमान, सर्वात अधिक प्रगत, असें मानणें हा देखील एक अंधश्रद्धेचाच भाग नसेल काय ? विमानाचे पंखे गरगरत होते. छतांतल्या नळींतून गार वारा येत होता. अनेकदा सुचलेले प्रश्न मला पुन्हा पुन्हा सुचत होते. आम्ही खरोखरच पुढारलेले असूं तर अद्याप आम्ही रक्तपात कां करतों ? लढतों का ? निरुपद्रवी भारतावर चीननें चढाई कां करावी ? जगांत न्याय या शब्दांना कांहीं अर्थ आहे कीं नाहीं ? कीं संघर्ष हाच जगाचा न्याय आहे ? माझें मन वाटेल तसें भरकटत होतें.

विमानाची गति शेकडों मैलांची होती, पण ती जाणवत नव्हती. तें आकाशयान स्थिर असल्यासारखें वाटत होतें. पण जें वाटत होतें तें खरें नव्हतें. मुंबईवरून धावणारी स्थानिक गाडी भयंकर खडखडाट करते. त्यामुळें तिच्या गतीविषयी उगाच भ्रम उत्पन्न होतो. गदारोळ म्हणजे गति असें उगाच वाटूं लागतें. तर मग आजचा मनुष्यसमाज नुसता गदारोळ करीत होता कीं त्याला गति होती ? तो गति नुसतीच चक्राकार होती कीं ती प्रगति होती ? आम्ही खरोखरच पुढें जात होतों काय ? अधिक चांगले होत होतों काय ? कीं अडाणी अहंकारापायीं आम्हांला आमच्या प्रगतिविषयी भ्रम झाला होता ? विमान धांवत होतें. प्रश्न संपत नव्हते. उत्तरें मिळत नव्हतीं.

तोच माडगूळकर मला हलवीत म्हणाले, "कुठें आहांत बुवा ?"

"आभाळांत !" त्यांच्या नेहमीच्या प्रश्नाला मी नेहमीचें उत्तर दिलें.

मात्र ह्या वेळीं मी भुईवर बसून गुंगत नव्हतों, खरंच आभाळांत होतों.

"दादा, आता दिल्ली जवळ आली बरं का !" दिल्ली-मुंबईच्या अनेक फेऱ्या केलेले देशपांडे मला सांगत होते.

दूर असलेली दिल्ली खरंच जवळ आलेली होती. अगदीं कांहीं तासांत दिल्लीच्या परिसरांत आम्ही येऊन पोहोंचलों होतों. पोटांतलें पाणीसुद्धां हललें नव्हतें. धूळ नाही, धूर नाहीं, थकवा नाही. डोळ्यांत कोळशाचे कण नाहीत कीं कपड्यावर एक डाग नाहीं. इतक्या धड अवस्थेंत दिल्लीपर्यंत आल्यामुळें मला जरा चुकल्यासारखें वाटलें.

दिल्लीच्या वाऱ्या मी फाळणीपूर्वी अनेकदां केल्या होत्या पण त्या साऱ्या खुष्कीच्या मार्गानें. आंबलेल्या अंगानें व चुरगळलेल्या कपड्यांनीं. पण तेव्हांहि मला वाटायचें कीं वाष्परथाचा प्रवास जर इतका तापदायक होऊं शकतो तर भीमथडी तट्टावरून दिल्लीपर्यंत धक्के खात येणाऱ्या आमच्या मराठा बारगीरांचें कसें होत असेल ? नुसतेंच तट्टावरून यायचें. नाही तर हाणामाऱ्या करीत यायचें. दिल्लीश्वराचें खेळणें करणाऱ्या महादजी शिंद्यांच्या ग्वालेरला गाडी थांबली कीं हे विचार नेहमी माझ्या मनांत येत असत. वाटे कीं येवढ्या लांबचा प्रवास घोड्याच्या पाठीवरून करण्यासाठींसुद्धा ह्यांना सिंहासन द्यावें. अगदी दिल्लीचें साम्राज्यसिंहासन द्यावें.

आणि तीच दिल्ली आम्ही विनाप्रयास गांठली होती. विमान खाली उतरत होतें. पट्टे बांधण्याविषयींची प्रेमळ सूचना चमकूं लागली होती. दिल्लीच्या खुणा मला पाहतां पाहतां पटत होत्या. विष्णुस्तंभाचा (कुतुबमिनार ?)



अनुक्रमणिका









**...?**

बँकिंग संबंधीं आणि विशेषतः आपल्या **उद्योग धंद्याचा** विकास अगर **आयात निर्यात** व्यापाराची वाढ-यासंबंधीं कांहीं अनपेक्षित अडचणी निर्माण झाल्या असल्यास आमचा सल्ला व मार्गदर्शन आपल्याला खात्रीनें उपयोगी ठरेल.

कारण, व्यापार, उद्योगधंदे व सर्व तऱ्हेच्या आर्थिक व्यवहारा-संबंधीं गेल्या ५० हून अधिक वर्षांचा अनुभव आमच्या पाठीशीं आहे.

# दी बँक ऑफ इंडिया लि.

टी. डी. कंसारा,
जनरल मॅनेजर



B/C/166–MAR












अनुक्रमणिका

परिसर व तो स्तंभ मी पाहताक्षणीं ओळखला. हळूहळू वस्तू अधिक मोठ्या होत होत्या. माणसें दिसूं लागलीं होतीं. विमान धरणीच्या दिशेनें सरकत होतें. चटकन् केव्हांतरी तें धांवपट्टीला लागलें, व धांवत राहिलें. धांवलें धांवलें आणि मग थांबावयाचें तेथें नेमकें थांबलें. कसलाच ठावठिकाणा नसलेल्या येवढ्या अवाढव्य आभाळांत विमान चुकलें कसें नाही, आखीव मार्गानें तें जातें कसें, आणि अगदीं ठरलेल्या ठिकाणीं उतरतें कसें ह्यासारख पोरकट प्रश्न मला सतावीत होते. पण विमानठाण्यावर विमान थांबलें व मग विचाराला



उत्तर-दिग्विजय करणारे पांच साहित्यिक आणि मे. शंकरराव पोतदार

वेळच उरला नाहीं. शिडीवरून धरणीवर उतरावें लागलें. समोरच महाराष्ट्र इन्फर्मेशन सेंटरचे श्री केळकर दिसत होते. त्यांनीं आम्हांला स्वयंप्रेरिकेंत घातलें व पालमहून नव्या दिल्लीकडे चालविलें. 'जनपथ' हॉटेलांत त्यांनीं आमच्यासाठीं जागा राखून ठेवल्या होत्या

"जनपथ" हें नांव साधेसुधें वाटत असलें तरी तें निवासस्थान साधेसुधें नव्हतें, तेथील कर्मचारीवर्गहि साधासुधा नव्हता. प्रसंगीं एखादा कारकूनहि स्वतःला विसरे. वेटरहि नवाबासारखीं उत्तरें देई. सामान्यतः गोडीगुलाबीनें वागणारे श्री पु. ल. देशपांडेहि एका 'कर्मचाऱ्या'चा माजोरीपणा पाहून विलक्षण चवताळले. मग आमच्या सारख्यांची काय कथा ? दिल्लीचें हें सर्व मला नवें होतें. पालम ते 'जनपथ' पर्यंतच्या प्रवासांत दिल्ली पालटल्याचें मी पहातच होतों. अन्य अनेक नगरांप्रमाणेंच दिल्ली विलक्षण वाढली होती. व त्या वाढीच्या प्रमाणांतच ती बकाल बनली होती. प्रमाणाबाहेर वाढलेली लोकसंख्या कुठल्याहि गांवाचा मूळ स्वभाव बुडवून टाकते. सूज वाढते व मूळचा पिंड कुठल्याकुठें लपून जातो. दिल्लीचें तसेंच झालें होतें. एरवीं आर्जवी, अदबशीर बोलण्यावागण्याविषयीं प्रसिद्ध असलेलें तें गांव ! पण मुंबईच्या तुसडेपणाला मागें टाकील असा शिष्टपणा तेथें आतां मला दिसत होता. मोठ्या पाहुण्यांचें माहेरघर असलेलें 'जनपथ' देखील ह्याला अपवाद नव्हतें. एका मोठ्या गांवांतला एक मोठा गुण डागळला ह्याचें मला वाईट वाटलें.

एरवीं 'जनपथ'चा सांचा मला पाठ होता. औरंगाबादच्या "स्टेट होटेल" (आताचें रेल्वे-हॉटेल) पासून तो सिमल्याच्या "सेसिल" पर्यंत उंची हॉटेलांचा थोड्याफार अंतरानें एक ठसा उत्पन्न झाला आहे त्यांतलेंच हें मजलेदार 'जनपथ' होतें. येथलें खाणेंपिणें जसें सोन्याचें असतें. वाटीभर ताकाचें मोल कुणी दोन रुपये सांगितलें, तर कसें वाटेल ? पण ह्या हॉटेलांचा हिशेब असाच कांहीं असतो. घरांत वशीभर सार जवळजवळ फुकटांत मिळतें. पण इथली गोष्ट न्यारी. मोठ्या विकानांतील सामान्य वस्तूंच्या महागड्या मोलाचें स्पष्टीकरण देतांना अर्थशास्त्राचे आमचे प्राध्यापक राघवैय्या सांगत असत, "तुम्ही तें मोल प्रतिष्ठा, वातावरण, देखावा व सेवा ह्यांसाठीं देत असतां."

पैकीं सेवेचा प्रकार ध्यानांत येऊन चुकला होता. म्हणून आम्हीं विनसेवेचें स्नान करून टाकलें. माडगूळकर व मी एका खोलींत होतों. देशपांडे, कानेटकर व सवनीस दुसऱ्या खोल्यांतून विखुरले होते. पण लवकरच आम्ही एकत्र जमलों. सायंकाळचा कार्यक्रम ठरलेला होता. त्यापूर्वीं कांहीं ऊनी कपडे विकत घ्यायचे होते. लडाखच्या थंडीला तोंड देण्यासाठीं माकडटोप्या, हातमोजे, गळपट्टे, डगले, ह्यासारख्या वस्त्रविशेषांची सांघिक खरेदी झाली दिल्लींत थंडी नव्हतीच. पण ती इतकी नसेल ह्याची कल्पना नव्हती. सरत्या ऑक्टोबरांत दिल्लींत पंखा लागला. हा अनुभव नवा होता. मला स्वतःला कडक थंडी आवडते. लडाखमध्यें तरी ती भरपूर प्रमाणांत असावी, व मुंबईंत रजेवर असणारे आमचे ऊनी कपडे तेथेंतरी कामीं यावेत, अशी मी मनोमन प्रार्थना केली व आम्ही सारे 'महाराष्ट्र इन्फर्मेशन सेंटरमध्यें उपस्थित झालों.

श्री. केळकरांच्या प्रेरणेनें तेथें एक लहानसाच कार्यक्रम झाला, पण फार चांगला झाला. विमानांत बसल्यापासूनच आम्हां साऱ्यांना पंख फुटले होते. एक प्रकारें अंगांत आलें होतें. माडगूळकर देशपांड्यांनीं आपल्या 'काव्यगाय'नानें काळजास हात घातला. शब्द व सूर झेपावत उठले. कांहीं क्षणांत 'यॉर्क बिल्डिंग'च्या त्या खोलींत साक्षात् रंगदेवता अवतरली (ह्या देवतेनें आम्हांला साऱ्या प्रवासभर कधीं सोडलेंच नाहीं.) माडगूळकरांचें काव्य व देशपांड्यांचें गायनवादन ह्या क्षणींहि माझ्या ध्यानांत आहे. कानांत आहे. त्यांनीं गायनासाठीं निवडली ती संतवाणी. महाराष्ट्राच्या ह्या दोन ख्यातिप्राप्त कलाकारांचें कुठल्या शब्दांत कौतुक करावें तेंच मला कळेना. ती धुंदी सायंकाळभर पुरली, रात्रींहि पुरली. खरं म्हणजे साऱ्या प्रवासांत ती कधीं उतरलीच नाहीं. क्षणभर चमकल्यासारखें झालें तें सफदरजंग विमानतळावर विमान चुकलें तेव्हां ! (किंवा आम्ही चुकलों तेव्हां.)

(पृष्ठ ५४ वर)



*स्वादिष्ट, उत्तम चहाची*
*तलफ भागविण्यासाठीं*

# टाटा-फिन्ले
## चहा
*अप्रतिम चहा आहे!*

टाटा-फिन्ले चहा आपल्याला नेहमीं ताजा, स्वादिष्ट सुवासयुक्त, आणि हवा तसाच कडक मिळतो. याला कारणेंहि तशींच आहेत.

### ताजा चहा
टाटा-फिन्ले चहा खास पॅकबंद पुड्यांतून व डब्यांतून मिळत असल्यानें तो नेहमींच ताजा असतो.

### स्वादिष्ट चहा
टाटा-फिन्ले चहांत अगदीं निवडक अशीच पत्ती वापरली असल्यानें, आपल्याला नेहमीं स्वादिष्ट सुवासयुक्त चहा मिळतो.

### उत्तम चहा
टाटा-फिन्ले चहा काळजीपूर्वक मिश्रित केलेला असतो, त्यामुळें आपल्याला नेहमीं कडक व उत्तम चहा मिळतो.

**टाटा-फिन्ले चहा प्या,**
**चहाचा खरा आस्वाद घ्या!**








मराठी रंगभूमीचे
पहिले आणि
प्रमुख शिल्पकार

# गोविंद बल्लाळ देवल

वसंत शांताराम देसाई

**मराठी** रंगभूमीची स्थापना होऊन आतां एकशेंवीस वर्षे होऊन गेलीं आहेत. या काळांत, इतर भारतीय रंगभूमींच्या तुलनेंत, तिनें जें असामान्य यश मिळविलें त्याचे शिल्पकार अनेक आहेत. परंतु त्या शिल्पकारांपैकीं गोविंद बल्लाळ देवल हे पहिले आणि अजूनहि प्रमुख शिल्पकार असले तरी त्यांच्या कामगिरीचा व्हावा तितका गौरव किंवा अभ्यास झालेला नाहीं. देवलांची कामगिरी आतां फक्त त्यांच्या नाटकांपुरतीच शिल्लक उरली असून, त्यांच्या नाटकांत सकृद्दर्शनीं नेत्रदीपक असें कांहीं नसल्यामुळें त्यांच्या कामगिरीकडे दुर्लक्ष झालें आहे असें कदाचित म्हणतां येईल.

मराठी संगीत रंगभूमीची–किंवहुना आधुनिक मराठी रंगभूमीची ज्यांनीं स्थापना केली ते अण्णासाहेब किर्लोस्कर हे देवलांचे वाङमयीन गुरु तर खरेच, परंतु त्या गुरुशिष्य संबंधाची– सुरुवात देवलांच्या विद्यार्जनाच्या काळांत झाली होती. शालेय शिक्षणासाठीं देवलांनीं वेळगांवला स्थलांतर केलें आणि वेळगांवच्या शाळेंत ते शिकूं लागले त्या वेळीं अण्णासाहेब हे त्यांच्या अनेक शिक्षकांपैकीं एक शिक्षक होते. देवलांनी आपल्या प्रत्येक नाटकाच्या सुरवातीला आपले गुरू म्हणून अण्णासाहेबांना अत्यंत आदरानें आणि निष्ठेनें वंदन केलें आहे. परंतु अण्णासाहेबांचें लक्ष रंगभूमीकडे सुरवातीपासून आकर्षित झालें असलें आणि जुन्या रंगभूमीसाठीं कांहीं आस्थानें रचून त्यांनीं कांहीं काळ जुन्या परंपरेंतील नाटयव्यवसायहि केला असला तरी मराठी रंगभूमीच्या उन्नतीच्या दिशेनें पहिलें पाऊल देवलांनीं अण्णासाहेबांच्या पूर्वी टाकलें होतें. विष्णुदास भावे यांच्या परंपरेंतील रंगभूमीला कलाटणी देण्याच्या हेतूनें देवल आणि शंकरराव पाटकर ह्यांनीं आर्योद्धारक मंडळीची स्थापना करण्यापूर्वी अण्णासाहेबांनीं किर्लोस्कर नाटक मंडळीची स्थापना केली होती. शेक्सपिअरच्या 'अथेल्लो' नाटकाचें देवलांनीं केलेलें मराठी रूपांतर, म्हणजे त्यांचें 'झुंझारराव' नाटक याच संस्थेनें प्रथम रंगभूमीवर आणलें

। महाराष्ट्रांत मुंबई विद्यापीठाची स्थापना होऊन नवशिक्षितांचा वर्ग प्रथम निर्माण झाला, तेव्हां त्याच्यासमोर कालिदासासारखे संस्कृत नाटककार आणि इंग्रजी नाटककारांतील शेक्सपिअर ह्यांचेच आदर्श होते. आधुनिक मराठी रंगभूमीच्या स्थापनेसाठीं झटणाऱ्या देवलांनीं मराठी प्रेक्षकांना शेक्सपिअरच्या

*यंदाचें मराठी नाट्यसंमेलन नगर येथें मे महिन्यांत भरत असून, मराठींतील एक श्रेष्ठ साहित्यिक आणि "दीपावली"शी स्नेहबद्ध असे श्री. पु. भा. भावे यांची अध्यक्षपदीं सुयोग्य निवड झालेली आहे. "दीपावली" तर्फे या संमेलनास शुभेच्छा. या प्रसंगीं चोखंदळ नाट्यसमीक्षक श्री. देसाई यांनीं देवलांच्या नाट्यासंबंधींच्या दृष्टिकोनाचा करून दिलेला हा रसीला परिचय जाणिवपूर्वक प्रसिद्ध करीत आहोंत.*

---

नाटकांची गोडी समजावी या हेतूनेंच 'झुंझारराव' नाटक लिहिलें. देवल हे नुसते भाषांतरकार नसून असामान्य नाट्यदृष्टि असलेले नाटककार होते. 'अथेल्लो' नाटकाचें भाषांतर महादेवशास्त्री कोल्हटकर यांनीं पूर्वीच केलेलें असलें तरी मराठी प्रेक्षकांना रुचेल अशी 'अथेल्लो'ची रंगावृत्ति देवलांनी तयार करून तिला 'झुंझारराव' असें नांव दिलें, तेव्हांपासून इंग्रजी वाङ्मयांत ज्याप्रमाणें 'अथेल्लो' त्याचप्रमाणें मराठी वाङ्मयांत 'झुंझारराव' सुपरिचित झाला. नाटकांतील भाषा क्लिष्ट नसावी, ती सोपी असावी हें खरें असलें तरी नुसती सोपी भाषा नाटकाला उपकारक ठरूं शकत नाहीं. ती जितकी सोपी तितकीच नाट्यपूर्ण असावी लागते. नाटकाच्या भाषेंतच जर नाट्य नसलें तर अभिनयसंपन्न नटांचें कौशल्यसुद्धां फुकट जाण्याचा संभव असतो. देवलांच्या 'झुंझाररावां'ची भाषा जितकी सोपी तितकीच नाट्यपूर्ण आहे, इतकेंच नव्हे तर इंग्रजींत मांडलेल्या उत्कृष्ट विचारांचेसुद्धां तितकेंच उत्कृष्ट मराठीकरण कसें करावें याचा तो एक सुंदर नमुना आहे. मराठी रंगभूमीचा गद्य विभाग हा सुरवातीला शेक्सपिअरच्या नाटकांच्या मराठी रूपांतरांनी गाजविला, त्याची सुरुवात देवलांच्या 'झुंझारराव' नाटकानें केली.

शेक्सपिअरसारख्या असामान्य नाटककाराच्या एका असामान्य कलाकृतीचें मराठींत रूपांतर करणें ही कामगिरी बिकट असली तरी तिला शेक्सपियरच्या नांवलौकिकाचा फायदा मिळावा हें क्रमप्राप्तच होतें. परंतु 'मर्फी' या नाटककाराचें किंवा त्याच्या 'ऑल इन् दी रॉंग' या नाटकाचें नांवसुद्धां कदाचित महाराष्ट्रांत माहीत नसेल, अशा स्थितींत देवलांनीं त्याच्या आधारावर आपलें 'फाल्गुनराव' म्हणजेच 'संशयकल्लोळ' हें अमर नाटक रंगविलें. झुंझारराव ही शोकांतिका तर फाल्गुनराव हा सर्वस्वी "गमत्या"!

मराठींत आतांपर्यंत हास्यरस निर्माण करणारीं अनेक नाटकें झालीं, त्यापैकीं एकालाही फाल्गुनरावाची सर आली नाहीं. फाल्गुनरावांतला विनोद हा सर्वस्वीं प्रसंगनिष्ठ आणि स्वभावनिष्ठ आहे हें त्याचें वैशिष्टच असलें, तरी त्या विनोदाला सर्वस्वीं सहाय्यक आणि अत्यंत नाट्यपूर्ण असे संवादहि देवलांनीं लिहिले आहेत. गडकऱ्यांसारखी भाषा लिहिणें जेव्हढें बिकट तितकेंच फाल्गुनराव नाटकांतील भाषेसारखी भाषा लिहिणें बिकटच समजलें पाहिजे. 'झुंझारराव' आणि 'फाल्गुनराव' या दोन रूपांतरित नाटकांत देवलांनीं शोक, शृंगार आणि हास्य या प्रेक्षकांच्या आवडत्या रसांचा परिणामकारक पण शालीन प्रवाह एकसारखा खेळतां ठेवला आहे.

अण्णासाहेब किर्लोस्करांनीं मराठी संगीत रंगभूमीची स्थापना करतांना १८८० सालीं कालिदासाच्या 'शाकुंतल' नाटकाचें मराठी रूपांतर रंगभूमीवर आणलें त्यावेळीं शकुंतला गात नव्हती. त्यानंतर एका वर्षानें भाऊराव कोल्हटकरांसारख्या असामान्य गायक नटाचा संग्रह करून त्याची अण्णासाहेबांनीं शकुंतलेच्या भूमिकेसाठीं योजना केली त्यावेळीं ती भूमिका शिकविण्याची आणि शकुंतलेसाठीं पदें करण्याची कामगिरी त्यांनीं देवलांवर सोंपविली.. या दोन्हीहि कामगिऱ्या देवलांनी अत्यंत यशस्वी रीतीनें पार पाडल्या. अण्णासाहेबांच्या मृत्यूनंतर किर्लोस्कर नाटकमंडळीचें नेतृत्व भाऊराव कोल्हटकरांकडे आलें, तेव्हांपासून संगीत रंगभूमीवरील देवलांच्या कामगिरीलासुद्धां बहर आला असें म्हणावें लागेल. अण्णासाहेबांची संगीत रंगभूमि ही संस्कृत नाटकांच्या छायेंत वाढली होती. त्या परंपरेचा उत्कर्ष साधतील अशीं 'मृच्छकटिक' आणि 'शापसंभ्रम' हीं देवलांची नाटकें भाऊरावांच्या अमदानींतच किर्लोस्कर मंडळींच्या रंगभूमीवर आलीं. इंग्रजी नाटकांतील रस आत्मसात करून तो मराठींत उतरविण्याचें कौशल्य ज्याप्रमाणें देवलांनी दाखविलें त्याचप्रमाणें संस्कृतांतला



रससुद्धां मराठींत उतरविण्याचें कौशल्य त्यांनीं दाखविलें. प्रसंग आणि रस यांना सर्वस्वी अनुकूल अशी भाषा देवलांनीं आपल्या प्रत्येक नाटकासाठीं वापरली आहे. 'झुंझारराव' आणि 'मृच्छकटिक' या दोन्ही नाटकांतील भाषा देवलांची आणि सारखीच सोपी, परंतु त्यांतील वातावरणाप्रमाणें या दोन्ही नाटकांच्या भाषेंत जे सूक्ष्म भेद आहेत ते अभ्यास करण्यासारखे आहेत. भावेकालीन पौराणिक रंगभूमि असो, संस्कृताच्या छायेंत वाढलेली किर्लोस्करांची संगीत रंगभूमि असो, शेक्सपिअरचा आदर्श समोर ठेवणारी रंगभूमि असो किंवा नवनाट्याचा अभिमान बाळगणारी अद्ययावत रंगभूमि असो, नाटकांतील भाषा कशी असावी या प्रश्नांचें जर उत्तर द्यायचें असेल तर अजूनहि किर्लोस्कर आणि विशेषत: देवलांच्या नाटकांकडेच बोट दाखवावें लागेल.

नाट्यसंस्थांच्या आणि नाटककारांच्या क्षणभंगुर स्पर्धेच्या अभिनिवेशांत देवलांचा 'भाषांतरे नाटककार' असा एकेकाळीं उपहास करण्यांत येत असे. परंतु इंग्रजी किंवा संस्कृत नाटकांचीं रूपांतरें देवलांनीं जितक्या कौशल्यानें केली तितक्या कौशल्यानें आंतापर्यंत कुणीच केलीं नाहींत याची साक्ष गेल्या एक्शेंवीस वर्षांचा इतिहासच देऊं शकेल. परभाषेंतल्या एखाद्या असामान्य नाटकांतलें नाट्य, रस आणि इंगित्र ओळखून आणि तें आत्मसात करून तितक्याच प्रभावीपणानें मराठींत उतरविणें, मराठी प्रेक्षकांना रुचेल अशा रीतीनें त्या नाटकाच्या कथानकाला किंवा संवादाला वळण लावणें अशीं अनेक कार्यें खऱ्याखुऱ्या रूपांतरकाराला करावीं लागत असल्यामुळें तो मूलत:च महान नाटककार असावा लागतो. आपण केवळ भाषांतरे नाटककार नाहीं हें जणूं काय सिद्ध करण्याकरितांच देवलांनीं 'शारदा' नाटक लिहिलें. 'शारदे'इतकें प्रभावी आणि लोकप्रिय सामाजिक नाटक १८९९ सालापूर्वीं, तर मराठींत झालेंच नव्हतें, परंतु त्यानंतरच्या गेल्या पासष्ठ वर्षांत सुद्धां 'शारदे'शीं तुलना करतां येईल अशा नाटकाची मोजदाद करतांना एका हाताच्या बोटापलीकडे मजल मारतां येईल असें वाटत नाहीं. १८८० ते १८९९ या कालखंडात देवलांचीं नाटकें रंगभूमीवर आलीं आणि त्या नाटकांमुळें मराठी रंगभूमी अत्यंत लोकप्रिय झाली. शोक, शृंगार आणि हास्य या रसांचा रंगभूमीवर कसा उत्कर्ष साधावा हें देवलांच्या रूपांतरित नाटकांनीं दाखविलें आणि समाजसुधारणेकरितां नाटकाचें हत्यार किती प्रभावीपणानें वापरतां येतें याचें प्रात्यक्षिक मराठी रंगभूमीच्या इतिहासांत प्रथम देवलांच्या 'शारदे'नें दाखविलें. सांगलीनजीकच्या हरिपुरांतल्या एका पिंपळाच्या पारावर बसले असतांना देवलांनीं बाला-वृद्ध विवाहाची एक घटना ऐकली. ती प्रथम त्यांच्या अन्त:करणाला भिडली, त्यानंतर त्यांच्या असामान्य प्रतिभेनें तिला नाट्यस्वरूप प्राप्त करून दिलें आणि अखेर त्या घटनेंतील नाट्य महाराष्ट्राच्या नजरेस पडतांच तो खडबडून जागा झाला ! सामान्य घटनेंतून असामान्य नाट्य निर्माण करण्याचें कसब फक्त महान नाटककाराच्या ठायींच संभवूं शकतें.

नाटकांतलें संगीत हा प्रकारच मुळीं अनैसर्गिक आहे असा अनेकांचा दावा असून तो सर्वस्वीं अमान्य करतां येण्यासारखा नाहीं. परंतु नाट्याच्या निर्मितीकरतां रंगभूमीला अनेक प्रकारची अनैसर्गिकता पत्करावी लागते, पचवावी लागते आणि ती जणूं काय नैसर्गिकताच आहे असा भास उत्पन्न करावा लागतो. संगीतामुळें नाटक हें अधिक परिणामकारक आणि लोकप्रिय होऊं शकेल हें ओळखून अण्णासाहेबांनीं त्यांच्या नाटकांतील संगीताला शक्य तितकें नैसर्गिक बनविलें. त्यांच्या नाटकांतील पात्रें एकमेकांशीं सोप्या पण प्रासादिक संगीताच्या भाषेंत बोलूं लागली. संगीतांतील संवादाला अनुकूल असे शब्द आणि चाली अण्णासाहेबांनीं त्यांच्या नाटकांतल्या पदांसाठीं वापरल्या. नाटकांत जर संगीत पाहिजे असेल तर तें अण्णासाहेबांच्या नाटकांच्या संगीतासारखें असावें असा अभिप्राय संगीताच्या टीकाकारांनीं सुद्धां वारंवार व्यक्त केला आहे. अण्णासाहेबांनीं नाटकांच्या संगीताला जी दिशा लावली त्या दिशेनेंच देवलांनीं त्यांच्या नाटकांतील संगीत निर्माण केलें. संवादांत गद्य आणि पद्य यांचें बेमालूम मिश्रण केलें म्हणजे संगीत हें नाटकापासून निराळें नसून तो नाटकाचाच एक अविभाज्य भाग आहे असें वाटूं लागतें, असा किर्लोस्कर देवलांचा विश्वास होता. देवलांचा हा विश्वास, 'मानापमान' आणि 'विद्याहरण' हीं नाटकें रंगभूमीवर आल्यानंतरहि न ढळल्यामुळें 'संशयकल्लोळ' नाटकासाठीं त्यांनीं वापरलेलें संगीत बहुतांशीं पूर्वीच्याच थाटाचें आहे 'शापसंभ्रम' आणि 'मृच्छकटिक' या नाटकांसाठीं ज्या थाटाचें संगीत देवलांनीं वापरलें त्याच थाटाचें संगीत 'शारदे'सारख्या सामाजिक नाटकासाठीं वापरून त्यांनीं एक विक्रमच केला आहे असें म्हणावें लागेल. किंबहुना सामाजिक नाटकांसाठीं देवलांनीं ज्या कौशल्यानें संगीताला राबविलें त्या कौशल्यानें कोणीहि राबविलें नाहीं असें दिसून येईल. 'शारदा' नाटकांतील संवाद लिहिण्यापूर्वीं देवलांचीं सर्व पदें तयार होतीं हें लक्षांत घेतलें, म्हणजे देवल हे नाटकाच्या कथानकाचा सुद्धां संगीतांतूनच कसा विचार करीत होते आणि संगीत हा नाटकाचा अविभाज्य भाग व्हावा यासाठीं किती खबरदारी घेत होते तें स्पष्ट होईल.

महाराष्ट्रांतील संगीत आणि गद्य रंगभूमीच्या स्थापनेच्या वेळीं देवलांनीं अशा रीतीनें फार मोठी आणि महत्त्वाची कामगिरी बजावलेली आहे. मराठी रंगभूमीची जात, तिची रसिकता, तिची महत्त्वाकांक्षा, तिची अभिरुचि, तिची परिणामकारकता आणि तिची लोकप्रियता सुरवातीपासूनच ज्यांच्यामुळें निश्चित झाली त्यांच्या नामावलींत नाटककार देवलांना अग्रस्थान द्यावें लागेल. परंतु देवल हे जितके थोर नाटककार तितकेच थोर नाट्यशिक्षक होते. रंगभूमीचा जर उत्कर्ष साधावयाचा असेल तर शिक्षणाचें सत्र नाट्यसंस्थेंत अहोरात्र चालूं राहिलें पाहिजे याची जाणीव त्यांनीं प्रथम निर्माण केली. भाऊरावांच्या अमदानींतल्या किर्लोस्कर मंडळींत नाट्यशिक्षणाचीं सूत्रें हातीं घेतल्यानंतर देवलांनीं स्त्री-

मूमिका करणाऱ्या भाऊरावांचें पुरुप भूमिका करणाऱ्या भाऊरावांत रूपांतर घडवून आणलें. चिंतोपंत गुरव आणि कृष्णराव गोरे यांच्यासारखे नामांकित नट देवलांच्याच तालमींत तयार झाले. रंगभूमीवर परिणाम करावयाचा असेल तर नटानें प्रत्येक शब्द जितक्या सहजतेनें तितक्याच नाट्यपूर्ण पद्धतीनें उच्चारला पाहिजे आणि नटाच्या अभिनयांत आणि गायनांत संयम पाहिजे अशी देवलांची शिकवणूक होती. पुरुपांनीं स्त्री भूमिका करण्याच्या काळांत पुरुपाचा अभिनय स्त्रीसारखा दिसावा म्हणून स्त्री भूमिका करणाऱ्या नटांना शिक्षण देतांना त्यांनीं कमालीची कल्पनाशीलता दाखविली. गणपतराव वोडस यांच्यासारखा महाराष्ट्राचा एक महान् नट देवलांच्या तालमींतच तयार झाला, आणि गायनाभिनयाचे पहिले धडे बालगंधर्वांना देवलांनीच दिले. 'शारदा' नाटकाच्या वेळीं भाऊरावांच्या नायकाच्या भूमिकेच्या सोवतीला शारदेच्या भूमिकेसाठीं गंगाराम डवरी याच्यासारखा अगदीं नवखा नट निवडून त्याची भूमिका देवलोंनीं यशस्वी करून दाखविली. आपल्या पद्धतीनें नाट्यशिक्षण देणारे चितु वुवा गुरव आणि गणपतराव वोडस असे दोघे शिष्यसुद्धां देवलांनीं तयार केले.

—मराठी रंगभूमि कोणत्याहि अवस्थेंत असो, देवलांची रसिकता, नाट्यदृष्टि, संयम आणि नाट्यशिक्षणासंवंधींची त्यांची जागरुकता या गोष्टींची आठवण आणि जाणीव तिला उपकारक ठरल्याशिवाय रहाणार नाहीं ! ●●●





"साधु राजपुत्राला. म्हणाला "सात समुद्रापलीकडे एक वेट आहे. त्यांत एक वाग आहे वागेत एक पक्षी आहे...." पुढची गोष्ट तुम्हां आम्हांला माहित असेलच. राजपुत्र तेथें जाणार त्या पक्ष्याला पकडून त्यास राजकन्येचा पत्ता विचारणार....कांहीं घटना घडल्यानंतर शुभमंगल. मला प्रश्न पडतो तो निराळाच. तें कोणसेसें वेट सात समुद्रापलीकडेच कां असावें ? सहा समुद्रापलीकडे किंवा आठ समुद्रापलीकडे कां नसावे ?

पण अजूनतरी मला या प्रश्नाचें उत्तर सापडलेलें नाही. तें उत्तर सापडलें तर...तर आणखी कितीतरी प्रश्नांचीं उत्तरें मिळतील. इंद्रधनुष्याचे रंग, पृथ्वीवरील खंडें, भारतातील मोक्षदायिका नगरी, संगीतातले सूर, या साऱ्यांची संख्या सातच कां ? हिमगौरीला सातच वुटके कां भेटले ? सिंदवादची प्रवासाची आवड सात सफरींतच कां संपुष्टांत यावी ? वोक्यांपासून पिलांचें रक्षण व्हावें म्हणून मांजरी सातच घरांचा दौरा कां काढते ? सप्तपदी झाल्याशिवाय विवाहवंधन पक्के होत नाही. प्रेमळ पती-पत्नींना साताजन्माचे सोवती म्हणून संवोधण्यांत येते. पण पत्नी झांटिपी किंवा त्राटिका निघाली तर पतिराज जातात देशांतराला पळून. ते सात वर्षे परतले नाहीत तर पत्नीनें खुशाल दुसरे लग्न करावे अशी स्मृतिकारानी सवलत देऊन ठेवली आहे.

आर्पकवींनाही सातचा आंकडा प्रिय असावासे दिसतें. रामायणाचीं कांडें सात. सुग्रीवाची खात्री पटवून देण्यासाठी रामचंद्राला सात ताल वृक्ष एका वाणानें तोडून दाखवावे लागले. (चमत्काराशिवाय नमस्कार नाहीं हेंच खरं.) रामायणांतच सप्तजन म्हणून सात ऋषि होते. ते सात सात दिवस उपाशी रहात. साताचे महत्व पांडवांनाही कळले होते म्हणूनच सैन्याची संख्या सात अक्षौहिणी होतांच त्यांनीं भरती थांववली. पांडव विजयी झाले खरे पण त्यांची माणसे उरली किती ? सात. पांच पांडव, सहावा कृष्ण, सातवा सात्यकि. "पांच पांडवांचा एका स्त्रीशी विवाह कसा लावून देतां येईल ?" ही कुंतीला पडलेली शंका "वेदांमध्यें सात भावांनीं एका स्त्रीशी विवाह केला असा उल्लेख सांपडतो." असें उत्तर देऊन युधिष्ठिरानें दूर केली आहे.

कालिदासालाही शेक्स्पियर प्रमाणें विपुल साहित्य निर्माण करतां आलें असतें. पण सात ग्रंथ लिहूनच तो स्वस्थ वसला त्याचे कारण "सप्त चिरंजीवांप्रमाणेंच माझेही सात ग्रंथ चिरंजीव रहातील." असा विचार त्याच्या मनांत आला असावा. त्यानें आपल्या सर्वोत्कृष्ट कलाकृतीचे शांकुतलाचे सात अंक लिहिले. शेक्स्पियरनें मानवी जीवनाच्या सात अवस्था कल्पिल्या आहेत. (As you like it).

"मी सांगितलेले सात नियम पाळाल तर तुमच्यावर परचक्र येणार नाही." असें भगवान् वुद्धाने वज्जी गणांस सांगितले होते. "माणसांतून निघालेला अशुद्धात्मा गांवभर भटकतो. त्यास योग्य असें स्थान आढळत नाही म्हणून तो पुन: पूर्वस्थानी येतो. हे पूर्वस्थान प्रशस्त आहे असे पाहून तो आपणांपेक्षां अधिक दुष्ट अशा सात अशुद्ध आत्म्यांना पाहुणे म्हणून वोलावतो." असे उदाहरण येशूनें अपुऱ्या सुधारणांविषयी वोलतांना दिलें होतें. जैनतत्त्वज्ञानांतील स्यात्‌वाद हा आईनस्टाईनच्या तत्वज्ञानाशी पुष्कळच मिळतो. स्यात्‌वादानुसार विश्वाच्या स्वरूपाविपयीं जास्तीत जास्त सात कल्पना करतां येतात.

भारतीय पुराणांत पाताळे सात आहेत, असें म्हटले आहे. तर वॅबिलोनीयनांच्या पुराणांत पृथ्वीभवती सात भिंती आहेत, असा उल्लेख सापडतो. ग्रीक पुराणांतील हैड्रा या राक्षसाला सात तोंडें होतीं. उच्चैःश्रव्यास सात मुखे. सूर्याच्या रथात सात घोडे. प्रजापती सातच.

मुंबई वेट मूळची सात वेटे जोडून तयार झालेले तर रोम सात टेकड्यांवर वसलेले, (राजधानीचे शहर कोठे वसवावे यावद्दल रोम्युलस व रेम्युस या जुळ्या भावांमध्यें तंटा होवून रेम्युस मारला गेला. रेम्युलसनें आपल्या पसंतीप्रमाणें रोमची जागा निवडली.




अनुक्रमणिका

रोम्युलसची निवड योग्य होती हे रोमच्या कित्येक शतकांच्या इतिहासावरून दिसून येत आहेच.) डेसियस या रोमन सम्राटाच्या जुलमाला कंटाळून सात लोक निघाले. त्यांना म्हणे सक्तीने तीनशें वर्षे झोपवण्यांत आलें. या सात कुंभकर्णांची दंतकथा पाश्चात्यांत फार प्रसिद्ध आहे. सॉक्रेटिस पूर्वी थेल्स्, पिटॅकस्, बायस, शीलो, क्लोव्युलस, पेरिॲंडर अणि सोलोन हे प्रमुख तत्त्वज्ञ Seven wise men of Greece म्हणून प्रसिद्ध होते. सेंट पॉलनें आशियात स्मर्ना, पेरॅम्माओस, थिट्रीया, सार्डीस, फिलाडेल्फीया व लाओडिसीया या सात ठिकाणीं चर्चेस स्थापलीं. मध्ययुगांत इंग्लंडचा सेंट जॉन, स्कॉटलंडचा सेंट अँड्रयू, आयर्लंडचा सेंट पॅट्रीक वेल्सचा सेंट डेव्हीड, स्पेनचा सेंट डेव्हीड, फ्रान्सचा सेंट डेनीस आणि इटलीचा सेंट ॲंथनी हे Seven champions of christendens म्हणून प्रसिद्ध होते.

सप्त-वार्षिक युद्ध झालें नसतें तर ? इंग्रजांचे पाय भारतात पक्के रोवले गेले नसते. अमेरिकन स्वातंत्र्ययुद्ध व फ्रेंच राज्यक्रांती या जगाच्या इतिहासाला कलाटण्या देणाऱ्या घटनांचे भवितव्य कांहीं वेगळेंच झालें असतें. १६८८ त इंग्लंडमध्यें झालेल्या रक्तहीन राज्यक्रांतीला चालना मिळाली सात बिशपांवरील खटल्यानें.

हत्तीचा 'सर्व्हे' करायला गेलेल्या आंधळयांची संख्या सातच. 'संस्कृत देवे केली आणि प्राकृत काय थोरांनीं केली ? असा प्रश्न संत एकनाथांनीं मागेंच विचारून संस्कृताचे दास्य झुगारण्याची घोषणा केली. पण अजून आपण संस्कृतच्या दास्यांतच आहोत. विचारे अष्टपुत्रे आणि दशपुत्रे अजून संस्कृतचे मिंधे आहेत. सातपुते मात्र संस्कृतचे बंधन तोडून कधीच मोकळा झाला आहे. सातपुत्यांवरुन आठवलें. आपल्या जुन्या कहाण्यांनाही सात आंकडा फार प्रिय होता. बुधबृहस्पतीच्या कहाण्यांतील राजाला सात मुलगे, सोमा परटिणीच्या कहाणीतील ब्राह्मणांनाही सात मुलगे, वर्णसठीच्या कहाणीतील ब्राह्मणास सात कन्या. (या कहाणीतील नायिका म्हणजे ब्राह्मणाची सातवी मुलगी शेक्सपियरच्या किंग लियर मधील कॉर्डेलियेची भारतीय आवृत्ती वाटते. ब्राह्मणानें प्रत्येकीला विचारलें. "तूं कोणाच्या नशिबाची ?" पहिल्या सहाजणींनीं गोनरील व रिगात या किंग लियरच्या तोंडपुज्या स्वार्थी मुलींप्रमाणें पित्याला अहंकारास पुष्टी देणारेंच उत्तर दिलें, "आम्ही तुमच्या नशिबाच्या." सातवीने मात्र कॉर्डेलियेप्रमाणें सडेतोड उत्तर दिलें "मी माझ्या नशिबाची.")

मातृभूमीला उद्देशून स्वा. सावरकर म्हणाले–

"हे काय बंधु असतो जरी सात आम्ही ।
त्वत्स्थंडिलीच असते दिवले वळी मी ।

पांच पांडव, चार दाशरथ, असे आदर्श बंधुवाचक शब्द प्रयोग रूढ असतांना स्वा. सावरकरांना सात हा अंक कां सुचला हे पहायचा प्रयत्न केला तर आपणांस असें आढळून येईल कीं, – we seven या कवितेंतील कारुण्य आणि पद्मिनीच्या दिव्य जोहारानंतर तिचा पुतण्या राणा लक्ष्मणसिंह याच्या कोंवळया वयाच्या सात मुलांनीं एकामागून एक रणांत उतरून केलेल्या बलिदानातच त्याचें रहस्य दडलें आहे. "बहलोलखानांस बुडवल्या-वांचून आम्हास तोंड दाखवूं नये" असा शिवाजीराजांचा खरमरीत निरोप येतांच प्रतापराव गुजर व त्याचे सहा सहकारी अपुऱ्या तयारीनिशींच शत्रूवर तुटून पडले व धारातीर्थी पडले. "वेडांत मराठे वीर दौडले सात." त्यांचीही त्यांना आठवण झाली असेल.

पुण्यांतील प्रसिद्ध कसबा पेठेत सात तोटी नामक एक भाग आहे. पूर्वीं तेथे खरोखरच सात तोटया होत्या. (आतां एकच आहे. पण तिला जर विचारलें "तुम्ही कितीजणी ?" तर ती गर्जून सांगेल. christendens . ज्या कोणी पहिल्या प्रथम या सात तोटयांची स्थापना केली त्या अज्ञात महाभागांस या सात जणींच्या रुपानें सप्त महानद्यांचे दर्शन आपणांस घडावें असें तर वाटत नसावें नां ? शिवाजीराजांनीं नाहीं कां तुळजापूरला जाऊन वारंवार देवीचे दर्शन घेतां येत नाही म्हणून प्रतापगडावरच देवीची मूर्ती स्थापली. काबेल्यास जाऊन हसन हुसेनाच्या कबरीचे दर्शन घेतां येईना म्हणून नाहीं कां बाबरानें हिंदुस्थानांत डोल्यांची प्रथा सुरू केली ?)

खरें म्हणजे साता विषयी अधिक संशोधन करायचा अधिकार पंडीत सातवळेकरांचाच. "आपल्या कानीं सात बाळ्या खंडोबाच्या कानीं आठ बाळ्या" या म्हणींचा उलगडा तेच करू शकतील. या म्हणीतील सात बाळ्यांचा सातवळे गाव बसविणाऱ्या (सातवळी) व आठ बाळ्यांचा आठवले आडनांवाशी कांहीं संबंध आहे का हे ही सांगू शकतील.

आपण मात्र आतां सप्तर्षींना वंदन करून हे साताचे पुराण संपवावे हे बरें; नाहीं का?



**साहित्यिकांना आपापलें स्थान दाखविणारा हा अत्यंत खुमासदार विनोद लेख....**

*सरकारने एखाद्या सूचनेचा कधी खदखदा हंसून विचार केला आहे काय ? निदान सरकार कधी हंसलें काय ? .... नाहीं ना–! तसें कोणाच्याच ऐकिवांत नाहीं. खरं म्हणजे सरकार कोणत्याहि गोष्टीचा गंभीरपणेच विचार करीत असतें. तसा गंभीरपणेच या सूचनेचाहि विचार सरकारने करायला पाहिजे. आतां पाहूं या सरकार कसा विचार करतें तें.... हंसून की गंभीर....!*

**सांप्रत** साहित्य-सृष्टींत अतीव गोंधळ माजला असल्यानें सरकारनें साहित्यिकांचें अधिकृत वर्गीकरण करावें अशी एक सूचना करण्यांत आली आहे. सरकार या सूचनेवर गंभीरपणें विचार करीत आहे, असें कळतें. खरें म्हणजे सरकार कोणत्याहि गोष्टीचा विचार गंभीरपणेंच करीत असतें. सरकार हंसल्याचें कोणी ऐकलें आहे काय ? तसेंच सरकारनें एखाद्या सूचनेचा विचार खदखदा हंसत केल्याचें कोणी पाहिलें आहे काय ? नाहीं, सरकार नेहमी गंभीरच हवें, त्याचा विचारहि गंभीर हवा. तेव्हां सांगायचें काय, तर साहित्यिकांचें गॅझेटेड वर्गीकरण कसें करावें याचा गंभीर विचार सांप्रत चालू असून त्यासंबंधीं एक कायदाहि रचला जात असल्याची कुणकुण आहे.

सरकारनें साहित्यिकांचें वर्गीकरण करावें असें मलाहि वाटतें. एक तर, असें केल्यानें सर्वच साहित्यिकांना वर्गीकृत जमातीचे फायदे मिळतील. एकदां साहित्यिकांचें वर्गीकरण अधिकृतपणें केलें, म्हणजे पहिल्या

अनुक्रमणिका






—रमेश मंत्री




वर्गाचे कवि कोण, दुसऱ्या वर्गाचे कादंबरीकार कोण, तिसऱ्या दर्जाचे कथालेखक कोण किंवा दहाव्या पायरीचे टीकाकार कोण याबद्दल वाद माजण्याचें कारण नाहीं. आमच्या मराठी साहित्यांत तर आजकाल असें झालें आहे, कीं कोणीहि उठावें-किंवा न उठतांच – आणि कुणावरहि टीका करावी. लहान मोठ्यांचा बोज राहिलेला नाहीं, वड्यांवड्यांबद्दल आदर नाहीं, कांहीं नाहीं. हा प्रकार थांबवलाच पाहिजे. एवी तेवी आजहि सरकार लेखकांना पारितोषकें देऊन त्यांचा दर्जा ठरविण्याचा प्रयत्न करीतच आहे. मग हेच प्रयत्न जरा वाढविले, तर मराठी लेखकांचें सरकारी वर्गीकरण (आणि सूचि) करणें कांहीं जड जाणार नाहीं. सरकारनें केवळ वर्गीकरणावरच थांबूं नये, तर पहिल्या दर्जाच्या लेखकांवर दुसऱ्या दर्जाच्या लेखकानें टीका करूं नये असाहि कायदा केला पाहिजे. अर्थात मग दुसऱ्या दर्जाच्या साहित्यिकावर टीका करण्याचा हक्क तिय्यम वर्गातील लेखकांस राहणार नाहीं, हेंहि उघड आहे. असें कायद्यानेंच सर्वांना बांधून टाकलें कीं आज साहित्यांत दिसणारी बेदिली, अनादर हीं समूळ नष्ट होतील यांत शंका नाहीं.

लिखाणास सुरुवात केल्यावर कांहीं दिवसांनीं प्रत्येकाला आपल्या साहित्याचे नमुने सरकारकडे मूल्यमापनास पाठवावे लागतील अशी नियोजित कायद्यांत तरतूद असल्याचें ऐकतों. वजन मापें, औषवें इत्यादींचा दर्जा ठरविणाऱ्या सरकारी खात्यांतच साहित्यांत 'अॅग् मार्क' देणारी शाखा सुरू करण्यांत येईल. या खात्यांत तज्ज्ञ साहित्यिक काम करतील. आलेले साहित्याचे नमूने बाटलींत घालून ते तपासले जातील. कारण साहित्याचा आणि बाटलीचा साहजिकच फार निकटचा संबंध आहे. या तपासणीवरहुकूम तज्ज्ञ साहित्यिक दर्जा ठरवितील. हा दर्जा किमान दोन वर्षे चालू राहील. दोन वर्षांनंतर कोणीहि लेखक आपलें फेर-मूल्यमापन करावें अशी मागणी करूं शकेल-त्यासाठीं त्याला १५ रु. प्रवेश फी व एका फॉर्मसोबत आपलें नवें साहित्य पाठवावें लागेल.

अशा रीतीनें सरकारी प्रयोगशाळांत वारंवार तावूनसुलाखून निघाल्यावरच साहित्यिकांचा दर्जा उंचावूं शकेल. मग लेखक आपल्या नांवापुढें आपली वर्गवारीहि लिहूं शकतील. एखाद्या मासिकांत 'प्रेमाचा तिळगूळ' अशी कथा आली, तर तिच्यापुढें लेखक: दामाजी निळकंठ पेटारे एम्. डब्ल्यू. एस्. जी. या इंग्रजी आद्याक्षरांचा अर्थ मराठी रायटर ऑफ सेकंड ग्रेड असा असेल. म्हणजे मग या साहित्यावर फक्त पहिल्या दर्जाच्या लेखकालाच टीका करतां येईल. इतरांनी टीका केल्यास त्या टीकाकारावर लेखक कायदेशीर इलाज करूं शकेल. वरच्या वर्गातील साहित्यिकांवर टीका केल्यास त्या गुन्ह्याबद्दल सहा महिने स. म. एक हजार रुपये दंड अशी शिक्षा देण्याची तरतूद कायद्यांत असावी, म्हणजे वावदूक—टीकाकारांवर जरब बसेल.

पहिल्या वर्गाचे साहित्यिक ही बाब मराठींत आजच मोठी नाजूक झालेली आहे. कारण, त्यांच्याविषयीं कोणी प्रतिकूल बोललेलें किंवा लिहिलेलें त्यांना खपत नाहीं. 'माझ्याविषयीं लिहिलें तर चांगलेंच लिहिलें पाहिजे, नाहींतर माझ्या वाटेस जाऊं नका' असा त्यांचा बाणेदार इशारा असतो. त्यांची सोय सरकारनें आधीं केली पाहिजे. त्यांच्या सोयीसाठीं सरकारनें असा कायदा केला पाहिजे कीं सरकारमान्य अशा पहिल्या दर्जाच्या साहित्यिकावर कोणीहि टीका करतां कामा नये, केल्यास तो सजापात्र व दंडपात्र गुन्हा होईल. अशा रीतीनें कायद्यानेंच प्रथम दर्जाच्या साहित्यिकांना 'अभय' दिल्यावर त्यांना मन मानेल तशी साहित्य-निर्मिती करतां येईल. आज काय होतें कीं दिवाळी-सारख्या 'अर्थवाही' काळांत मोठे मोठे (म्हणविणारे) साहित्यिक अगदी सुमार लिखाण भरपूर प्रमाणांत करून सुगी साधतात. पण या वाढीव वाङ्मयाबद्दल नाखुशी व्यक्त करून कांहीं संपादक आणि वाचक

मात्र या अव्वल दर्जाच्या साहित्यिकांचा हिरमोड करतात. सरकारनें जर असा कायदाच केला, तर मात्र पहिल्या दर्जाच्या साहित्यिकांना संपादकांच्या किंवा वाचकांच्या नाखुशीचा विचार करण्याचें कारण पडणार नाहीं कायद्यानेंच मुळीं सर्वांच्या टीकेला बंदी होईल. मग हे प्रथम श्रेणीचे लेखक जें देतील तें संपादकांना छापावें लागेल आणि वाचकांना वाचावें लागेल. कारण याच कायद्यांत 'प्रथम दर्जाच्या लेखकांचें साहित्य संपादकांना परत पाठवितां येणार नाहीं' अशीहि तरतूद असेल.

आतां हें मात्र खरें, कीं इतर प्रकारांच्या तुलनेनें कवींची वर्गवारी करणें मोठें विकट होईल. कारण मराठींत सगळेच कवि कालिदास, मिल्टन, शेले, ईलियट अशा कोणी ना कोणी जगविख्यात कविश्रेष्ठांचे नातेवाईक आहेत. या सर्व कवींचा वारसा आपल्याकडेच असल्याचें ते गीतेवर (कारण व्यास हाहि यांचाच नातेवाईक) हात ठेवून शपथ घेऊन सांगतात. त्यांच्यांत डावे-उजवे निवडून काढणें म्हणजे स्वतःला त्यांच्या काव्याचे विषय करून घेणें आहे. पहिल्या श्रेणीच्या खालीं कोणीहि कवीला घातल्यास 'पूर्व-जन्मीं मीच राम होतों आणि मीच कृष्ण होतों' अशी परंपरा तो लगेच सांगेल. अर्थातच मग मागील जन्माचें संशोधन करणें सरकारलासुद्धां जरा कठीणच जाणार आहे.

कवींच्या वर्गीकरणांबाबत आणखी एक अडचण अशी कीं, कवि केवळ वाचायचा नसतो, कधीं कधीं तो ऐकावाहि लागतो. कारण लोकप्रिय करावें म्हणून एकेकाळीं काव्यगायनाची प्रथा निघाली. पण हल्लीच्या बऱ्याच कवींच्या अंगीं 'गायनी कळा' नसली, तरी 'वाचनी कळा' असल्याने त्यांनीं काव्यगायनाच्या ऐवजी काव्यवाचनाची प्रथा सुरू केली. हळूहळू संगीतांतहि याच प्रथेचें अनुकरण होऊन रागदारी संगीताचेंहि निव्वळ वाचनच होईल कीं काय अशी आतां भीति वाटूं लागली आहे! या काव्यवाचनामुळें कवींचा समावेश केवळ लिहिण्याचा साहित्यिकांत न होतां वाचणाऱ्या साहित्यिकांत होत आहे—वाचल्या



पहिल्या दर्जाचा लेखक : विरुद्ध बोललेलें ज्याला खपत नाहीं. इतरांकडे नेहमी तिरकसच पाहाणारा.

जाणाऱ्या साहित्यिकांत नव्हे. तरीपण अनेक विकट समस्यांना तोंड देणारें सरकारचें कायदाखातें कवींच्या या खाक्यासहि तोंड देईल अशी आशा आहे.

साहित्यिकांचें वर्गीकरण केल्यानें आणखी एक प्रश्न सुटणार आहे. तो म्हणजे मानपानाचा. एकंदरींत पाहतां आमचे साहित्यिक फारच हळवे आहेत. त्यांच्या साहित्याबद्दल कटु बोललें तर ते दुखावतातच, पण कांहीं चांगले न बोलतां गप्प राहिले, तरी त्यांचा रोष होतो. सभासंमेलनांत त्यांना पुढच्या खुर्च्या न मिळाल्यास ते त्यावर बहिष्कार घालतात, किंवा मग निषेधाचीं जाहीर पत्रें तरी लिहितात. हा सर्व प्रकार टाळावा म्हणून माझी अशी सूचना आहे, कीं सरकारनें साहित्यिकांना त्यांच्या वर्गवारीप्रमाणें पदकें आणि लाल-जांभळ्या फितीहि द्याव्यात. हलक्या पातळीवरून किंवा अश्लील लिहिणाऱ्यांना फार तर पीत-वृत्तव्यवसायाप्रमाणें पीत-साहित्याचें निदर्शक म्हणून पिवळ्या रंगाचें चिन्ह द्यावें. लष्करांतील अधिकाऱ्यांप्रमाणें साहित्यिकांनीहि हीं पदकें व चिन्हें लावूनच फिरावें. म्हणजे कनिष्ठ दर्जाच्या साहित्यिकाकडून वरिष्ठ दर्जाच्या साहित्यिकाचा अवमान होणार नाहीं. उदाहरणार्थ, बसमध्यें किंवा आगगाडींत तिय्यम श्रेणीचा साहित्यिक आरामांत बसलेला असला व त्याच्या मागून पहिल्या किंवा दुसऱ्या दर्जाचा साहित्यिक आला, तर कनिष्ठानें त्याला उठून आपली जागा दिली पाहिजे, अशी कायद्यानेंच तरतूद केली पाहिजे. फार काय, सिनेमाच्या, बसच्या, नाटकाच्या इत्यादी क्यूमध्येंहि कनिष्ठ दर्जानें वरिष्ठ दर्जाच्या साहित्यिकास अग्रहक्क दिला पाहिजे.

हा कायदा करतांना साहित्यिकांच्या उतरत्या दर्जाचा सुद्धां विचार करावाच लागेल. कारण कांहीं साहित्यिक एकेकाळीं जरी चांगले लेखक असले, तरी पुढें पुढें 'दुग्ध-भैया' न्यायानें म्हणा किंवा 'इक्षुदंड–चिपाड' न्यायानें म्हणा त्यांचा दर्जा उतरत जातो. अशा लेखकांना मिळालेला दर्जा काढून घेतला जाईल काय किंवा कमी केला जाईल काय हा एक विचारार्ह प्रश्न आहे. हा प्रश्न दिसतो तितका सोपा नाहीं हें खरें. कारण, आपल्या साहित्याचा दर्जा अधिकृतपणें वाढवून मिळावा म्हणून अर्ज करणारे अनेक निघतील, पण आपला दर्जा कमी करावा अशी हांक सरकारला कोण देणार? त्याला एक उपाय आहे. तो असा, कीं अशा साहित्यिकाच्या गुप्त शत्रूंनीं सरकारकडे त्याच्या ताज्या निकृष्ट साहित्याचे नमुने पाठवायला हरकत नाहीं. अर्थात्, कोणत्याहि साहित्यिकास गुप्त शत्रूंचा कधींहि तुटवडा पडणार नाहीं, यांत शंका नाहीं.

आतां आणखी एक मूलभूत प्रश्न राहिला. तो म्हणजे आधीं साहित्यिक म्हणावेंच कोणाला? कारण अनेकदां बिन-साहित्यिक सुद्धां आपण सुप्रसिद्ध (या शब्दाला आजकाल कांहीं अर्थच राहिला नाहीं म्हणा) आहोंत असें सांगतात. उदाहरणार्थ, वृत्तपत्रांत जनमानसाचें प्रतिबिंब पाडणारे अनंत लेखक आहेत. त्यांना साहित्यिक कां म्हणूं नये? स्वतः साहित्य न लिहितां नुसती फौजदारी आणि दादागिरी करणारेहि कांहीं मातबर आहेत. त्यांना साहित्यिक म्हणायचें कीं नाहीं? सरकार-दरबारीं वजन असलेल्या आणि त्या वजनावर समाजांत दबाव आणणाऱ्यांना साहित्यिक म्हणावें कीं नाहीं? मराठींत न लिहितां एकदम साहेबाच्या भाषेंत लिहून मराठी वाचकांना स्तिमित (म्हणजे वंडरस्ट्रक) करणाऱ्या महाभागांची वर्गवारी कुणी लावायची—मराठी परीक्षकांनीं कीं इंग्रजी परीक्षकांनीं?

साहित्यसृष्टींत वजन मारण्याचा अगदी

अनुक्रमणिका

इंग्रजी प्रकार म्हणजे आपण मराठी साहित्यिक नव्हे असा आभास निर्माण करणें हा होय. म्हणजे असें, कीं कोणी मराठी साहित्यिक आधीं मराठी लेख लिहितो· मग त्याचें इंग्रजी भाषांतर मोठ्या परिश्रमपूर्वक करतो. तें कुठें तरी छापून येतें· मग त्याचें म्हणणें असें पडतें कीं, माझा मराठी लेख हवा असेल, तर त्या इंग्रजी लेखाचें मराठी भाषांतर करून घ्या. अशा द्राविडी प्राणायामानें मराठी जनांवरचा भाव वराच वाढतो असा अनुभव आहे. कारण मराठी न येणाऱ्या कुणाबद्दलहि आपल्याला एकंदरींत आदरच वाटतो. एखादी मराठी कथा बंगालीत भाषांतरित झाली आणि मग पुनः ती बंगालीवरून कोणी मराठींत केली कीं आम्हाला 'ब्रह्म' (बंगाली) पाहिल्याची धन्यता वाटते. अशा रीतीनें परभाषेंतून कृत्रिमपणें स्वभाषेंत येणाऱ्या साहित्यिकांसाठीं सरकारनें खास वर्गवारीची व्यवस्था करावी, वेस्टर्न रेल्वेच्या प्रवाशास सेंट्रल रेल्वेवरील स्टेशनचा पास द्यावा लागल्यास ज्याप्रमाणें उभय मार्गाचा मोसमी पास देतात, त्याप्रमाणें या लोकांना दोन्हीं भाषांतील वर्गवारीचा



**टीकाकार :**

**असमाधानी वृत्तीचा व ज्याच्या पोटांत नेहमीच दुखतें.**

पास द्यावा. मात्र मराठींत असा साहित्यिक पहिल्या किंवा दुसऱ्या वर्गात असला, तरी इंग्रजींत त्याचें स्थान कोठें आहे याचा शोध न घेणें हें सर्वांच्याच (खुद्द त्या साहित्यिकाच्याहि) हिताचें आहे, हें सांगणें नलगे.

साहित्यिकांचा आणखी एक प्रकार आहे. तो असा, कीं अशा साहित्यिकांची महत्ता साहित्याशिवाय कोठें तरी इतर क्षेत्रांत शोधावी लागते. असे साहित्यिक संगीत, चित्रकला, क्रिकेट, इत्यादि अनेक क्षेत्रांत कांहीं बाही सतत करीत असतात. त्यामुळें या साऱ्याच क्षेत्रांत त्यांचा उगीचच आपला दबदबा राहतो. असा दबदबा निर्माण करण्यांत ते स्वतःच पुढाकार घेत असतात आणि त्यांचे चाहते त्यांना मदत करतात. उदाहरणार्थ, ते साहित्यांत कांहीं फार मोठें कार्य करून राहिले आहेत अशा समजुतीनें त्यांना संगीताच्या क्षेत्रांतील लोक मानतात, ते मोठे संगीतज्ञ आहेत अशा भरवंशावर चित्रकलेंतले लोक त्यांना वचकून असतात आणि त्यांचा चित्रकलेच्या क्षेत्रांतील भाव फार मोठा आहे अशा समजुतीनें साहित्यांत त्यांचा भाव मजबूत असतो. 'कोण म्हणतो टक्का दिला ?' या मुलांच्या खेळाप्रमाणें त्यांच्या श्रेष्ठतेची खूण पटविण्यासाठीं कोणत्या तरी दुसऱ्याच क्षेत्राकडे बोट दाखवावें लागतें. भारताच्या राजधानींत असे कांहीं साहित्यिक आहेत. ते म्हणे मराठी, हिंदी, फ्रेंच, पोर्तुगीज अशा विविध भाषेंत साहित्य प्रसवतात. या साऱ्याच भाषांत ते फार मोठे साहित्यिक आहेत असें मानतात (असें ते सांगतात). कारण असें, कीं हिंदी साहित्यिक म्हणतात, "हिंदीतलं त्यांचं साहित्य फारसं चांगलं नसेल, पण महाराज, त्यांनीं मराठींत केवढें कार्य करून ठेवलं आहे, याची कल्पना नाहीं तुम्हांला. मराठींत ते पहिल्या दोन तीन साहित्यिकांत येतात." मराठी लोक म्हणतात, "मराठींत त्यांनीं फारसं वरं लिहिलं नसेल. पण फ्रेंच साहित्यांत त्यांनीं फार मोठी वाहवा मिळवली आहे." फ्रेंच आणि पोर्तुगीजहि असाच इतर भाषांचा हवाला देतात. सुदैवानें (या साहित्य-श्रेष्ठींच्या सुदैवानें) या भाषांतील लोकांना इतर भाषेंतील साहित्याची फारशी कल्पना नसल्यानें या हिकमती साहित्य-सम्राटांची नेहमींच सर्वत्र चलती होते. अशा बहुभाषी साहित्यिकांची वर्गवारी करून त्यांना बिल्ले देण्यासाठींहि सरकारनें खास विडो उघडली पाहिजे.

आतां मे महिन्यांत गोवें येथें मराठी साहित्य संमेलन भरत आहे. त्या दृष्टीनेंहि या वर्गवारीचा खास विचार केला पाहिजे. कारण यापुढें पहिल्या वर्गातील साहित्यिकांनाच अध्यक्षपदासाठीं उभें राहतां येईल अशी तरतूद आगामी 'वर्गवारी कायदा विधेयक–१९६४' मध्यें सरकार करणार आहे, अशी वदंता आहे. दुसऱ्या दर्जाच्या साहित्यिकांना अध्यक्षपदासाठीं नांवें सुचवितां येतील, तिसऱ्या दर्जापर्यंतच्या सर्व साहित्यिकांना अध्यक्षीय निवडणुकींत मतें देतां येतील आणि चौथ्या दर्जाच्या साहित्यिकांना फार तर हजर राहतां येईल. म्हणजे पहिल्या दर्जाचें सरकारी सर्टिफिकेट मिळविल्यावांचून साहित्य संमेलनाचें अध्यक्षपद मिळणें या कायद्यानंतर शक्य होणार नाहीं. अध्यक्षपदाचें एक जाऊं दे पण या कायद्यांतील आणखी एका तरतुदीनें तर साहित्यिकांच्यावर फारच मोठा आघात होणार असें ऐकतों. ही तरतूद अशी, कीं यापुढें फक्त पहिल्या दर्जाच्या साहित्यिकालाच शिष्या मिळण्याचा अधिकार राहील. इतर कोणत्याहि दर्जाच्या साहित्यिकाला प्रियशिष्या (साहित्यांतील) असणार नाहीं. दुसऱ्या दर्जाचे साहित्यिक फार तर नवोदित पुरुष लेखकांना मार्गदर्शन करूं शकतील. (त्याबद्दल दुर्दैवानें कोणत्याच साहित्यिकास उत्साह नाहीं !) कोणत्या तरी प्रतिष्ठित प्रकाशन-

**कवि :**

**कविता केवळ वाचूनच नव्हे तर नाचूनहि दाखविणारा.**



संस्थेंत राहून एखादा पोरसवदा प्राध्यापकहि आज जसा चार पोरीबाळींना साहित्याबद्दल गुळगुळीत मार्गदर्शन करूं शकतो, ती सोय या कायद्यानंतर राहणार नाहीं. साहित्य संमेलनाचें अध्यक्षपद हुकलें तर फारसें दुःख नाहीं, पण एखाद्या शिष्येला वाट दाखविण्याचेंहि स्वातंत्र्य दुसऱ्या व त्या खालच्या दर्जाच्या साहित्यिकांना राहूं नये, ही फारच अन्यायाची गोष्ट आहे.

मात्र माझ्या माहितीप्रमाणें या नियो-

अनुक्रमणिका

जित कायद्यांत सर्व साहित्यिकांचा फायदा करून देणारें एक कलम आहे. तें असें, कीं दारूबंदी कायद्यांत साहित्यिकांना खास सवलत मिळणार आहे. ती अशी, कीं एखादा माणूस साहित्यिक असेल, तर त्याला मद्याचा परवाना मिळण्यासाठीं वयाची अट असणार नाहीं. कोणत्याहि वयांतील साहित्यिकाला परवाना मिळेल. याचें कारण असें, कीं साहित्यिकाचें डोकें आधींच इतकें चढलेलें असतें कीं त्याच्यावर दारूचा वेगळा परिणाम होत नाहीं असा शोध अनेक वर्षांच्या संशोधनानंतर लागलेला आहे. म्हणून मद्यपान केलेल्या साहित्यिकापासून समाजाला (वेगळा) धोका नसल्याचें मत तज्ज्ञांच्या समितीनें सरकारला कळविलें आहे. त्यांतहि वारकावा असा, कीं पहिल्या दर्जाच्या साहित्यिकास यश आवींच फार चढलेलें असेल. आणि यशाची व कीर्तीची रग पहिल्या पासून चौथ्या दर्जाच्या साहित्यिकापर्यंत हळूहळू कमी होईल, असाहि अंदाज आहे.

आतां प्रश्न उरला टीकाकारांचा. ही जात महा कर्मकठीण आणि अति दुराराध्य. यांच्यापुढें साक्षात् स्वर्ग जरी आणून उभा केला, तरी ते असा अभिप्राय देतील : "इंद्रानें स्वर्गाचा प्रयत्न बरा केला आहे, पण अप्सरांची संख्या अधिक हवी होती व देवांची संख्या बरीच कमी हवी होती. वास्तविक, स्वर्ग म्हटल्यावर आपली जी कल्पना होते, ती कांहीं या स्वर्गानें प्रत्यक्षांत उतरल्यासारखी वाटत नाहीं. स्वर्गांतील जीवनाच्या बैठकीचें सम्यग्दर्शन करण्यास इंद्राचा हा प्रयत्न थिटा पडला, असें म्हटल्यावांचून गत्यंतर नाहीं. इंद्राचें हें यश म्हणजेच त्याचें अपयश आहे."

अशा टीकाकारांना वर्गवारींत घालणें म्हणजे कायदा करणाऱ्यांना मोठीच डोकेंदुखी आहे. त्यांची आतांपर्यंतची प्रवृत्ति लक्षांत घेऊन सरकार अशी तरतूद करणार असल्याचें समजतें कीं जो टीकाकार कधीहि कुणावद्दलहि एकसुद्धां चांगला शब्द काढीत नाहीं, त्याला पहिला दर्जा देण्यांत यावा. एक वर्षांत त्यानें चार वेळां जरी कुणाच्या साहित्यावद्दल बरें लिहिलें, तर त्याचा दर्जा कमी करून त्याला दुसऱ्या वर्गांत घालावें. याच क्रमानें मोकळ्या मनानें साहित्याची प्रशंसा करणारा खाली खालीं जाऊन अखेर चौथ्या वर्गाच्या गर्तेत जाईल अशी सोय करण्यांत आली आहे.

इतर कोणाहि साहित्यिकाला न मिळणारा एक खास फायदा टीकाकारांना या कायद्यानें मिळणार आहे. तो म्हणजे त्यांना सरकारतर्फे, पोटदुखीचें औषध मोफत पुरविलें जाणार आहे. खरें म्हणजे ही तरतूद मोठ्या हिकमतीनें केली आहे. कारण पोटदुखीवरचें औषध कोणीहि टीकाकार घेणार नाहीं, अशी सरकारची खात्री आहे. पोटदुखीच नसली, तर तो विचारा टीका काय करणार कपाळ ? तेव्हां हें औषध खपण्याची सरकारला मुळींच भीति नाहीं, हें उघड आहे.

एकंदरींत पाहतां सरकारनें आयोजिलेल्या या कायद्यांत अशा कांहीं किरकोळ कटकटी असल्या, तरी साहित्य क्षेत्रांतील आजच्या अराजकास त्यामुळें आळा बसेल आणि उच्चभ्रू साहित्यिकांचा अहंकार दुखवला जाणार नाहीं अशी आशा आहे. सरकारी अधिकाऱ्यांनी इकडे लक्ष दिलेंच आहे. आतां साहित्यिक मंडळीहि इकडे लक्ष देतील काय ? ●●●










# रांग



*....ती आश्चर्यानें
माझ्याकडे पाहते.
रांगेतलीं कांहीं जणं
पण माझ्याकडे आश्चर्यानें
पाहतात .... मनगटानें डोळे
पुसून ती आंत जाते....
आणि मग बस निघून जाते.
मी तसाच तिच्याकडे
पाहत राहतों आणि
मग पुन्हा....!*

—पद्माकर गावडेकर

**निळ्या-निळ्या** समुद्रांतून ग्रीष्माचें उत्तप्त ऊन कोसळत आहे. ग्रीष्म ऋतूचा रंग आभाळ प्यालेलें आहे. उन्हाळ्याचा दिवस. उघडा नागडा उन्हाळा हातपाय पसरून पडला आहे. रस्त्यावरचें डांबर वितळूं लागलें आहे. त्यावरून धांवलेले मोटर-टायर्सचे व्रण ओल्या मातीवरून धांवल्यासारखे स्पष्ट दिसताहेत. सकाळची वेळ. साडेदहा वाजलेत. वातावरण हळुंहळुं तापतें आहे. सकाळच्या उत्साहावर उन्हाचीं जाड पुटें चढूं लागलींत. चिकट घामाचा द्रव सोडत उन्हाचीं किरणें मानेवर बसलींत. उन्हानें पछाडलेल्या रहदारीनें रस्ता वाहतो आहे. रंगीबेरंगी बसेस् मुंगीनें मुंगीला वाजू द्यावी, तशा बगल देऊन धावताहेत. कर्कश कर्णे वाजवीत मर्सिडीज् बेंझ ट्रक्स धांवताहेत. कान फुटून जाताहेत. असंख्य कान फोडण्याची त्या ड्रायव्हरनें प्रतिज्ञा केलेली दिसतेय् !

ऑफिसची वेळ झालेली आहे. मी बसच्या रांगेंत उभा आहे. आज उशीर झाला आहे. रांग चांगली केंजळचाच्या मारुतीला भिडलेली आहे. दारिद्र्याच्या गर्तेत लोळणारीं माणसें रांग लावून लोळायला चाललीं आहेत. तीं अशीं रोजच जातात. त्यांतल्या पुष्कळांना त्याची जाणहि नाहीं आहे. पाहाणाऱ्यालाच भडभडून यावें इतक्या अजाणतेनें तीं रांगेबरोबर घसरताहेत. कुणी गर्भांतल्या अभिमन्यूसारखें या चक्रव्यूहांत शिरायला शिकलेत. त्यांतून बाहेर येण्याचा मार्ग चांचपडत आहेत. कुणी तो मार्ग सापडणार नाहीं हें माहीत असल्यामुळें त्या दुःखाकडे पाठ करून मिळेल तें सुख हावरटपणें घेत आहेत. आणि माझ्यासारखा कुणी या बीभत्स आयुष्यांतील कीड अलिप्तपणें पाहात उभा आहे. दुबळ्या पायांनीं, हळव्या मनानें. या बीभत्स जगांतील वाळवी माझ्याहि मनाला लागली आहे. साहाजिक आहे. मी कांहीं कुणी वेगळा नाहीं. साधू नाहीं.



हीं सारीं माणसें हद्दपार आहेत. They are exiled kings ! त्यांच्या रक्ताला दैन्याचा वास मारतो आहे. जीवनाला वेढून टाकणारें वांझोटें दैन्य ! यांच्यांत आदर वाटावा असा एकहि आसामी दिसत नाहीं. आंखलेल्या कार्यक्रमानुसार जातां न येणारे. स्वतंत्र कांहीं करूं म्हटलें तरी करतां न येणारे. स्वयंपूर्ण

जीवनाचा पाठलाग करणाऱ्या पराभवाचें भक्ष्य झालेले ! जीवनाचा तोच तो कित्ता पिढ्यान् पिढ्या गिरवीत आलेले ! बस् स्टॉप-वरच्या दोन दांड्यांतून गरांगरां फिरत-राहणारे घोटे ! संवयलेलें आयुष्य ओढाळ जनावरासारखें फरफटत नेणारे हे लोक ! आणि वासनेच्या छिद्राकडून मृत्यूच्या टिंवा-पर्यंत धांवणारी ही त्यांची रांग ! संसाराचा व्यापार करणारी ही रांग ! कांहीं तरी हरवल्याचा शोध घेणारी ही रांग !

कशासाठीं ही रांग?

नोकरीसाठीं?

कशासाठीं ही चाकरी?

पोटासाठीं?

पोटासाठीं चाकरी आणि तत्त्वासाठीं त्याग मग तत्त्वासाठीं नोकरीचा त्याग कां नाहीं?

मन व्याकूळ करणारा प्रश्न पडतो.

मला मर्ढेकरांच्या कवितेंतला राडार आठवतो. विश्वाच्या अनंत विस्तारांत कोठे तरी श्रेयस् प्राप्त करण्याकरितां पिसाटा-प्रमाणें वावरणाऱ्या रांगेचा हा राडार. . .!

फणफणलेला दिवस उन्हाचे सुस्कारे टाकतो. मिटल्या डोळ्यांपुढें त्या सुस्काराचे हिरवेनिळे बुडबुडे दिसतात. डोळ्यांची उघडझाप केली कीं, थोडेसें जगून पुन्हां मेल्यासारखें वाटतें आहे.

ओहोटलेल्या किनाऱ्याप्रमाणें उतरलेल्या चेहेऱ्याची, असहायतेनें वाहणारी एक प्रौढा समोरून येते. अशक्त लाटेसारखी येते. उध्व-स्ततेच्या कांठावर झुलत उभ्या राहिलेल्या आंधळ्यांच्या रांगेंत हलकेंच मिसळते. रांग तिला पोटांत घेते. . .

चुटुकल्या रुमालानें कपाळ पुशीत कोवळ्या (आणि लिबजडजूनहि) मुली रांगेंत उभ्या आहेत. पर्स सावरीत घड्याळ बघतात. धास्तावून जातात. एच. टी. ए. के. काय म्हणतील? मस्टर मिळेल कां? हे काळजीचे विषय चेहऱ्यावर चुप्प ठाण देऊन बसलेत. कांहीं चेहेरे अजून यायचे आहेत.

मी त्या स्कर्टमधल्या मुलीची वाट पाहातों आहे. तिची नेहमीची वेळ झाली आहे. अजून कां आली नाहीं? तांबडा स्कर्ट आणि पिवळा पोलका तिला छान दिसतो. बहुतेक अकरा-वी ला असावी. पहाटेच्या मंद्र चांदण्यासारखा तिचा चेहेरा आहे. रास्ता पेठेपर्यंत तिची सोबत असते. अजून लहान आहे. 'टिनेजर'. पण मला आवडली आहे. आवडीला वय नसतें. नसावें. मोठेपणीं तिनें या रांगेंत उभें राहूं नये, असें मला मनोमन वाटतें. या वाट-ण्याला कांहीं अर्थ आहे कां? निश्चित आहे. . . .

पलिकडच्या फूटपाथवरून एकाएकीं तुण-तुण्याचा टिपेचा स्वर ऐकूं येतो. डोक्यावर अंबाबाईचा जग घेतलेला एक जोगत्यांच, थवा नाचत असतो. दाढी केलेले बायकां. सारखे दिसणारे पुरुष फुगड्या घालत असतात. चावट आसनं होत असतात. त्यांच्या भोंवतीं रिकाम्या लोकांची गर्दी वाढत असते. काखेंतल्या चवांडक्याचा भंव-ळॉक् भंवळॉक् गुड्. गुड्. . गुड्. . गुड्. . गुड् गुड्. . गुड्. . गुड्. .गुड्. .पाडक्. . असा आवाज काढीत एक देवदासी जोरांत ओरडते.

"अरं, नाच की भाड्या ! रातचं पिठलं कुटलं न्हाई कां?"

गर्दीच्या वासना हंसतात. रांगेंतल्या मुली, देवआनंदचा सिनेमा ज्या तन्मयतेनें पाहा-तात; त्याच तन्मयतेनें तें दृश्य पाहातात. चांगल्या माणसांना लाज वाटते. माझी 'टिने-जर' आतां रांगेंत नाहीं याचें मला उगाच बरें वाटतें. थवा दूर जातो. स्वर, दृश्य रेंगाळत राहातात.

संवयलेल्या डोळ्यांनीं मी तें हलकटनाम डाळे चुरमुरे दृश्य पाहतों आहे. माझ्या डोक्यांत विचार येतो कीं, पलिकडच्या फूट-पाथवरून ते नपुंसक चाललेत. आणि या फूटपाथवरून आम्ही पुंसक रांगेरांगेनें आमचें गमावलेलें पुंगवत्व शोधीत आहोंत. नपुंसक आम्हीं आहोंत. हिजडे आम्हीं आहोंत. ते निदान नपुंसक म्हणून जन्माला आले आणि नपुंसक म्हणूनच जगताहेत. जगण्यासारखें कांहीं नसतांना ते मुक्तपणें आयुष्य जगत आहेत. आमची ही रांग संपूर्णपण घेऊन जन्माला आली आणि अपूर्णपणें जगते आहे. जीवन मुक्तपणें जगल्याचा एकाच्यातरी चेहेऱ्यावर आनंद आहे कां? मोह पायाखालीं चिरडून जाण्याची अदम्य ईर्ष्या एकाच्या डोळ्यांत तरी दिसते आहे कां? गुळगुळीत दाढ्या केलेले हे नर आणि मुळांतच दाढ्या नसलेल्या या माद्या — नोकरी करणाऱ्या सर्व माद्यांना दाढ्या असल्याच पाहिजेत, असा जी. आर्. हवा.— एका विलक्षण नपुंसकत्वानें पछाडलेल्या आहेत. . . .

"इश्य ! . . ." माझ्या कानावर स्त्रैण शब्द पडतात. माझ्या मागच्या दोन मुली बोलत असतात, "अगं, चांगलीं लोकं हंसताता दोन दिवस स्टॉपवर दिसलें नाहीं कीं-

'तुटो' मायसीन

डॉक्टरचें बिल मिळालेलें दिसतें !

विचारतात, 'काय कुठं गांवाला गेलां होतीं वाटतं?' मुस्काडींत द्यावीशी वाटते . . ."

मुस्काडींत द्यावीशी वाटते पण तें धाष्टर्य नाही. पुन्हां नपुंसकत्व. स्वेच्छेनें स्वीकारलेलें !

मी मात्र मनांतल्या मनांत तिच्या तीन मुस्काडींत देतों. 'लोकं हंसतात म्हणे? लोकं काय? अनेकवचनाचेंहि अनेकवचन? ह्यॅ : :–

जिमखान्यावरून धांवत येणारी एक बस येते. थांवते. 'चला, चार चला' असें कंडक्टर ओरडतो. चौघे चढतात. स्टॅंडिंग कपॅसिटी नसल्यामुळे स्टॅंडिंग घेत नाहीं असेंहि तो ओरडून सांगतो. तरीहि एक मूर्ख मुलगी पुन्हा म्हणते, "अहो, स्टॅंडिंग बसवाना . . ."

"स्टॅंडिंग बसवायचे कसे ?"

दाताचा कंगवा पुढें काढून तो हंसतो आणि 'ठणठण्' करून निघून जातो. बऱ्यापैकी जोक त्यानें मारलेला असतो. थोडी फार मंडळी हंसतात. त्या मूर्ख मुलीला तो कळलेला नाहीं. तरीहि ती लाजते.

गर्दीची प्रचंड रांग हत्ती झुलल्यासारखी पुढं सरकते. रांग पुढं सरकली तरी एक वावळट गृहस्थ उभेच राहिलेले असतात. कुठं तरी ध्यान ठेऊन. रांगेचे दोन भाग पडतात. मागचे लोक त्यांचें लक्ष वेधतात. रांग मोडून कसं चालेल? एक वस्ताद त्याच्यावर ओरडतात,

"ओऽऽऽपैलवान्, पुढं सरका. रामपारींच बंटा मारला काय ?"

कुणीतरी ढकलून दिल्यासारखे ते गृहस्थ पुढें सरकतात. ओशाळून आपल्याच वावळटपणाला हंसतात. पाऊस पडत असतांना मध्येंच उन्ह पडावें तसे. आयुष्यभर ते असेच हंसत आले असावेत. कुतरड्याच्या मौतीचें हंसू. मनांत घर करून राहणारें—भीति उत्पन्न करणारें . . . .

एका भरल्या संध्याकाळीं मी रस्त्यावर मरून पडलेलें एक काळें मांजर पाहिलें होतें. कुणीतरी धोंडे घालून मारलें होतें. उस्कटलेलें त्याचें तोंड हंसल्यासारखें वाटायचें. गिधाडांनी टोचलेलें तें कलेवर पुढें किती एक दिवस माझ्या मनांत वेळीं अवेळी उमें राहायचें आणि बघतां बघतां मेलेल्या तोंडानें हंसू लागायचें. त्या गृहस्थाचें हंसू पाहतां पाहतां मला त्या मृत मार्जाराचें हंसू आठवतें. गुदमरल्यासारखें होतें . . .

मेडिकल कॉलेजची एक विद्यार्थीनी शास्त्रीय ग्रंथ वाचतां वाचतां एकाएकी थबकते. वर पाहते. पातळ ओठांची महिरप रुंदावून हंसते. अगदी प्रसन्न. शेजारून खट् खट् बूट वाजवीत जाणाऱ्या तरुणाकडे पाहून तोहि हंसतो. तिचा वर्गमित्र जीवन मित्र. रांग सोडून ती त्याच्यामागें जाते. किळसवाण्या नजरेनें गर्दीकडे पाहात तो ऐटबाज ओरडतो,

"टॅऽऽक्सीऽऽ . . ."

तिच्या पाठीशीं हात टेंकून, कानाशीं तोंड नेऊन तो गुलुगुलु बोलत असतानांच टॅक्सी सुरू होते. निघून जाते. दूर जाणाऱ्या टॅक्सीच्या मागल्या काचेंतून दिसणारें तें दृश्य घोळवत चेहेऱ्यावर मुरूम फुटलेली, डोळ्यावर गॉगल्स लावलेली शेडमधली एक मुलगी उगाचंच हरवते. विरून गेलेल्या स्वप्नांचें भग्न तुकें तिच्या डोळ्यापुढें तरंगत असतें. रांगेंतल्याहि बऱ्याच जणांना वाईट वाटतें. रांग सोडून गेल्याचें . . . .

दहा मिनिटांचा एक थवा उडतो. आज बसेस उशिरां सुटताहेत. पावणे अकरा! जायला १०–१२ मिनिटें लागणार. मस्टर कसा मिळणार? महिन्यांतून तीन लेट म्हणजे एक कॅज्युअल लीव्ह गेली. छेः छेः उन्हानें रापलेले चेहरे चिडतात. अधिकच लाल होतात. ओरड करूं लागतात.





अनुक्रमणिका

"आज साल्या गाडचावि बंद पडल्यात." स्टॉप कंट्रोलर पुटपुटतो. उगाचंच उठून बस आली का पाहतो. हातांतली पिवळी पेन्सील वटन असलेल्या छातीवरच्या डाव्या खिशांत ठेवतो. पुन्हां त्रिकोणस्थ होतो. त्याच्यावर चिडू: काय उपयोग. पण 'लोकं' चिडत राहातात.

मी अस्वस्थ होतों आहें. स्कर्टमधली चिमुरडी अजून कां येत नाही ? कां दहा वीसच्या बसनें गेली ? नाहीं, पण तशी जात नाही ती . . . !

माझ्या पुढें दोन माणसें टाकून उभी असलेली एक मध्यमवर्गीय मुलगी शेजारच्या शेठीयाच्या दुकानाकडे एकटक पाहते आहे. तिथें टांगलेल्या साड्यांतील नगरी काठाची साडी या महिन्याला तरी घेता येईल कां, याचा दुःखद विचार ती करते आहे. फॉकला गुंड्या नसलेली तिची धाकटी बहीण तिच्या बुबुळांच्या आणि त्या साडीच्या मधोमध उभी असलेली मला दिसते. ती रडवेला चेहरा वळवते. इकडे तिकड पाहते. आपल्या मनांतले विचार कुणी ऐकले नाहीत ना, याचा अंदाज घेते. मीं तिला पकडलंय् याचा आनंद मला एकीकडे होतोय् आणि दुसरीकडे, तिच्या अंगठा तुटलेल्या चपला, पायाच्या उकलेल्या टांचा पाहून वाटतें कीं, धांवत जाऊन ती साडी तिला विकत घेऊन द्यावी. घे बाई, पण लोचट दुःख दाखवूं नकोस.

तिच्या पलीकडे एक वृद्ध जोडपें उभें आहे. म्हातारा नवरा म्हाताऱ्या बायकोला आधार देत उभा आहे. लटलटत्या शरीरानें. दोघेंहि थकलेत. आयुष्यांत सोसलेला सारा उन्हाळा त्यांच्या चेहऱ्यावर तटतटून उभा आहे. त्यामुळें वसला होणारा अधिक वेळ त्यांना मुळींच जाणवत नाहीं आहे. फक्त उन्हाचा त्रास होतोय. त्या दोघांच्या मागें एक मैंद गृहस्थ छत्री घेऊन उभा आहे. त्याच्या छत्रीची सावली अलिकडे पडली आहे. त्या सावलींत म्हातारीला उभें राहण्यासाठीं म्हातारा मिनत्या करतोय्. ती ऐकत नाहीं. हेकटपणें तिथेंच उभी राहते. राहायचं तर दोघांनींहि उन्हांत उभं राहायचें ना ! जीवनें तुडवीत गेलेल्या एका नव्या संस्कृतीखाली चिरडल्या गेलेल्या त्या वृद्ध श्रद्धा पाहतां पाहतां मला गलबलून येतें. उगाचंच 'ऊन पाऊस' चित्रपट आठवतो . . .

मी तोंड वळवतों. रस्त्यावर पाहतों. पब्लिक हेल्थ मधील ती नाजूक मुलगी सायकलवरून घाईघाईनें जात असते. म्हणजे ११ ला दहा मिनिटें कमी. आपण सायकल चालवतों म्हणजे हेलिकॉप्टरच चालवतों आहों, अशी तिची समजूत दिसते. केवळ आम्हांला सायकली नाहीत म्हणून तिची सायकल म्हणजे 'मिग' विमान ठरावें काय ? रांगेकडे 'तेंच' ठरल्यासारखें वघत ती जाते. रांगेंतलीं डोकीं तिच्या प्रवासाकडे वळतात. डोक्यांतलें निळेंजांभळें कृष्णकमळाचें फूल नाजूक बोटानें चाचपत ती दिसेनाशी होते.

पलिकडच्या फूटपाथवर एका चांभारा-समोर आपला बुटाचा पाय वरून एक ख्रिश्चन पोरगी बुटाला पॉलिश करून घेत आहे. कुठल्याहि अर्थानें एका पुरुषावर आपले पाय (आलटून पालटून कां होईना) धरायचा प्रसंग आलाय याचा तिला अभिमान वाटतो आहे. चांभारानें तिचा उघडा पाय डाव्या हातानें धरला आहे. तिला गुदगुल्या होत असाव्यात पार्श्वभागा-वरचा आपला कलिंगडासारखा असलेला यौवनाचा अविष्कार गदांगदां हलवीत ती किंचाळते आहे. मला वाटतें मी तो चांभार व्हावें आणि तो मूर्ख पाय करकचून पिळावा. उसाच्या कांड्यासारखा . . . . .

वांझोटच्या दृश्यांची ओशट चव घेत भिरभिरणारे माझे डोळे माझ्या अगदीं पुढें असलेल्या बाईवर स्थिरावतात. बाई गर्भवती आहे. एक कुलवंत कांति तिच्या अंगभर पसरलेली आहे. ती कासावीस झालेली आहे. पदरानें वारंवार गळा पुसते आहे. खांद्यावरचा पदर डोक्यावर घेते आहे. पुन्हां न राहवून खांद्यावर घेते आहे. तिला उभें राहवत नाहीं. उन्हानें आणि ओझ्यानें ती बेजार झाली आहे. तिचा गर्भ तापतोय्. आणखी कांही काळ ती अशीच उभी राहिली तर उन्हानें जसें तिचें डोळ्यांतलें काजळ वितळून खाली उतरलंय् तसा तिचा गर्भ वितळेल, असें मला वाटतें आहे. मी माझ्याच कल्पनेंवर खूप होतों. चंद्रानें टाके घातलेला गर्भ सूर्य किरणांनी वितळणार ! कित्ती छान कल्पना.

. . . . माझ्या मागचा माणूस मला चिकटल्याचा भास होतो. मी तिरस्कारानें मागें पाहतो. एक अतिशय लठ्ठ काळा माणूस माझ्या मागें उभा आहे. त्याच्या अंगाचें ओझें त्याला पेलत नाहीं आहे. नंदीबैलासारखा तो एकसारखा झुलतो आहे. एकापायावरून दुसऱ्या पायावर. त्याच्या काळ्याशार अंगाची मला शिसारी येते आहे. आठवण होईल, जाणवेल तसा मी त्याच्याकडे रागानें बघतों आहे. कारण त्या लडदूच्या अंगाला रेड्याच्या अंगासारखा वास मारतो आहे.

इतक्यांत एक कोरी ब्रेक्स वस कचकच् लावून स्टॉपला लागते. शेडमधील पहिले वीस पंचवीस चेहेरे लककन् चमकतात. आख्ख्या रांगेला उत्साह येतो. मी चिंतेंत पडतों. मला बस मिळण्याची फार थोडी आशा आहे. कारण, मी शेडच्याहि बाहेर चार फूट आहे. रांग अधीरतेनें पुढें पुढें सरकते. शेडमधलीं मंडळी उड्या मारून वसमधे चढतात. उन्हांतलीं मंडळी शेडमध्ये येतात. सावलीच्या गारव्यानें बरें वाटतें. पुढें सरकायला नको वाटतें. पण सरकावें लागतें. डबल बार मधून सरकत मी चाललों आहे. इतक्यांत रांगेंत एकच हंशा पिकतो . .

गुलमुशीच्या फुलाचा रंग जिच्या टाचां-वर उतरला आहे, जी लठ्ठहि नाहीं आणि कृशहि नाहीं, जिचा मध्यभाग वेदीप्रमाणें आहे अशी एक प्रमदा बस्मधें चढतेवेळीं बावळटपणें धडपडल्याचा साक्षात्कार साऱ्या रांगेला होतो. आपल्या गद्धेपंच-विशीचा ती जाहीर आविष्कार करते. तिच्या हातांतली पर्स खालीं पडते. ती घ्यायला वाकते. सुंदर कमान करते. पण तिच्या मागून चालणारें एक ध्यान तिच्यापेक्षाहि बावळट असल्याचें जाहीर होतें. तो सरळ जाऊन तिच्या वाकलेल्या पृष्ठभागावर आदळतो. 'लोकं' हंसतात. ती चिडते. फार लाजते, इतकी लाजते, इतकी लाजते,















अनुक्रमणिका

इतकी लाजते कीं स्टॉपवरच प्रसूत झाल्याचा ती अनुभव घेते. सगळ्या रांगेला वाटतें कीं, पृष्ठभागाशीं भिडणारा गृहस्थ आपण हवें होतों . . .

बसमधें चढणारा मी शेवटचा माणूस ठरतो. म्हणजे मला बस मिळते. मी हौद्यांत जाऊन बसतों. कंडक्टर खर्रर्र कट् चिमटा वाजवीत जवळ येतो. मी दहा पैशाचें नाणें काढून देणार तेवढ्यांत बसच्या दाराशीं गलगा होतो. माझी स्कर्टमधली चिमुरडी आलेली असते. रडवेला चेहरा करून बसमधें घेण्याविषयीं विनवीत असते. गयावया करीत असते. तिची परीक्षा आहे. तिला लवकर जायचें आहे. तिला उशीर झाला आहे. फार उशीर झाला आहे. कंट्रोलर चढत्या आवाजांत तिला रांगेंत उभं राहायला सांगतो. ती फार केविलवाणा चेहेरा करते. इतक्या लोकांना सोडून तिला घेणें शक्य नसतें. सगळ्यांनाच उशीर झालाय्. त्यांतून आज बसेस् उशिरां सुटताहेत. शेवटीं तो रडूं लागते. त्याहि परिस्थितींत तिच्या स्लीव्हलेस पोलक्यांतून दिसणाऱ्या कोऱ्या कांखेकडे कंडक्टर लोचटपणे पाहतो आहे. मला त्याची किरड येते. पिकलेला लिबलिबीत टॅमिटो त्याच्या चेहेऱ्यावर फेंकून मारावासा वाटतो—

आणि पाहतां पाहतां माझ्यांत एक विलक्षण शक्ति संचारते. मी ताडकन् उठून त्याच्या जवळ जातो. पैसे देऊन तिकीट मागून घेतों. आणि मोकळ्या हातानें त्याच्या थोतरींत लगावतो. आमची झोंबाझोंबी होते. फारसा प्रतिकार करायला त्याच्यापाशीं नैतिक सामर्थ्य नसतें. त्याची चूक त्याला कळलेली असते. मी शांतपणें बस्मधून उतरतों. माझें तिकीट तिच्या हातात ठेवीत तिला सांगतो,

" गाढवे, रडतीस कशाला ! जा तूं, तुला उशीर होईल . . . . . "

ती आश्चर्यानें माझ्याकडे पाहते. सारी रांग आश्चर्यानें माझ्याकडे पाहते. मनगटानें डोळे पुसून ती आंत जाते. बस निघून जाते. पाठमोऱ्या बसकडे पाहात मी चालतो आणि पुन्हा रांगेच्या शेवटीं उभा राहतों . . .

माझ्यापुढें आतां पाऊणशें माणसें आहेत. त्यांत तुरळक परिचित चेहेरे आहेत. ऊन अधिक भाजताहे. आभाळाचें कवच फोडून येणारीं उन्हाचीं किरणें मॅग्निफाईंग ग्लासमधून आल्यासारखीं कातडी जाळताहेत. समोर उभ्या असलेल्या इमारतींच्या छपरांवरून मृगजळाच्या वाफा निघताहेत. रांगेच्या दुःखांचीं ओझीं वाहणारे उंट त्या मृगजळांतून संथ सरकतांना मला दिसताहेत. आपल्याच सावल्यांचा पाठलाग करीत . . .

हिजड्यांचा तो थवा आतां आमच्या फूटपाथवरून येतो आहे. रस्त्यावरून उलट-सुलट गाड्या वाहाताहेत. उन्हाचें घर पाठीवर घेऊन रांगेची प्रचंड गोगलगाय हळुंहळुं पुढें सरकते आहे.

निदान आज तरी ती रांगेंत थांबली नाहीं . . .

चांदण्याला हातांत गुंफून दुपारचें उन्ह गुंगत चाललें आहे.

• • •





## अजून वाचायला नाहीं शिकलों–

"गौरी, गौरी," तुकाराम धांवत येअून म्हणाला "अगो ऐकलंस का? मी आज लिवायला शिकलों, लिवायला."

"अगो बाय !" गौरी म्हणाली. "काय लिवलं तरी तुमी?"

"कोनला म्हायीत," तुकाराम म्हणाला. "आजून मी वाचाया नाय शिकलों."

## तो मेला, पण–

शिरगणती करणाऱ्या माणसाने शांताबाईकडें आणि तिच्या सहा मुलांकडे गोंधळलेल्या मुद्रेनें पाहिलें. एक मूल तर अजून अंगावर पीत होतें.

" बाई " तो म्हणाला. " ही सर्व मुलं तुमचींच ना ?"

" होय." बाई म्हणाली.

" पण–नाहीं म्हणजे समजत नाहीं–तुम्ही तर आत्तां म्हणालांत तुमचा नवरा सहा वर्षांपूर्वी मेला म्हणून ?"

" म्हणालेंच मुळीं," बाई म्हणाली.

" प–पण–अं–हीं मुलं—"

" मग ? अहो माझा 'नवरा' मेला, मी मेलें नाहीं. "


SUNLIGHT
Soap






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





# भीष्माचा डोंगर

श्रीराम कामत



१८

पूर्व कथा सूत्र....

गांवांत कंपनी आली. मंत्र्यांनीं उद्घाटन केलं. सुरवातीला दाजी नाबरानं विरोध केला, तरी पण कंपनीच्या कामाला सुरुवात झालीच. अण्णागुरुजीचा भाचा विजय शिर्के कंपनीचा असिस्टंट मॅनेजर म्हणून गांवांत आला होता. त्याच वेळीं दाजीची कन्या वासंती पण शहरांतून गांवांत आली. विजय व वासंतीची नजरा-नजर झाली. पुढें तर त्यांचं प्रेमांत रूपांतर झालं.

इकडे कंपनीचं काम जोरांत सुरू होतं. तर तिकडे अण्णा-गुरुजीहि आपल्या कामांत दंग होते. कारण ग्रामपंचायतीच्या निवडणुका जवळ आल्या होत्या. अण्णा धांप लागेपर्यंत....पाय मोडेपर्यंत प्रचार करीत होते तर भाऊ कुळकर्णी, वंड्या वगैरे तेवढाच जोरदार विरोध करीत होते. शेवटीं मतदानाचा दिवस उजाडला. लोकांचा उत्साह दांडगा होता. परंतु अण्णा गुरुजी मात्र सुरकुतल्या चेहऱ्यानं बसला होता. भाऊ कुळकर्णी मात्र भलताच जोर करीत होता. दाजीला तें आवडलं नाही. तेव्हा दाजी उठला व अण्णाला आपला पाठिंबा दिला. तसा साऱ्या गांवाला चेव आला. आणि अण्णा . . . जिंकले. परंतु बामणांनीं मात्र दाजीला जातीच्या बाहेर टाकलें. दाजीच्या कान्त्याला तें खपलं नाही. तो त्या टारगट पोरांवर जाम तुटून पडला. पण व्यर्थ. पोरांनीच त्याला जाम पिटला . . . तो तसाच घरीं परत आला. पहातो तो काय ? वासंती व विजय एकमेकांच्या बाहुपाशांत विलगून उभी होती. पोरं जें सांगत होतीं तें खरं होतं तर . . . तसा तो भोंवळ येऊन खाली पडला . . . आणि वासंती . . .

आतां पुढे वाचा..










अनुक्रमणिका

**आतां** गांवाचं भलंच करूं निघाला होता, तेव्हां अण्णागुरुजी अरती-परती वघूं शकत नव्हता.

राजाभाऊ गोळयाला कंपनीचं भलं हवं होतं. कसंहि करून, कांहीं करून त्याला चिन्ता एक ती. दुसरी नव्हती.

उरला फक्त विजय-विजय शिर्के, असिस्टन्ट मनजर ! शिकलासवरलेला. आणि म्हणून नसता विचार करणारा. त्याला कांही गोष्टी दिसत. वाकीचा तर्क करतां येत होता—

मामाची समजूत घालण्याचा विजयनं बराच प्रयत्न केला. खूप सांगितलं कीं इथं कंपनींत नियम असतात, कायदे असतात. आणि कोणतीच गोष्ट या नियमांप्रमाणं झाली नाहीं तर कारभाराला अर्थ रहात नाहीं.

तरीहि अण्णागुरुजीनं आपला हट्ट खरा केलाच. पंचायतीचा मेंबर, ग्रामविकास-मंडळाचा अध्यक्ष, मुख्य म्हणजे कंपनीच्या खाणसमितींत गांवाचा प्रतिनिधि. म्हाताऱ्याच्या शब्दाला किंमत होती. तो तडकला, "तुझे ते कायदे आणि नियम घालँ चुलींत. माझा ठराव आहे, गांवच्या प्रत्येक माणसाला कंपनींत काम मिळालं पाहिजे. आधीं सोय गांवाची वघणार मी. ह्या अण्णा-गुरुजीची ती पॉलिशी ! आणि यापुढं आतां कंपनीची पण. सरळच सांगतों. कबूल असेल तर रहातों. नाहीतर निघालों-राजिनामा देतों धाडून."

कंपनीचा मॅनेजर राजाभाऊ गोळे इतकावेळ फक्त ऐकत होता. तो मध्यें पडला. मोठ्यानं हंसत म्हणाला, "तुम्ही काय म्हणाल तें अण्णा. मात्र हें राजिनाम्याचं वोलूं नका."

आणि हा अण्णा मग वशक काय वाटेल तें म्हणत राहिला. आणि खरोखरच तसं होतं गेलं.

गांवांत वेकार उंडारणाऱ्या पोरांना कंपनीत त्यानं रोजगाराला लावलं. कोणी मुकादम, कोणी वॉचमन, कोणी प्यून. कंपनींत त्यांतल्या त्यांत मानाच्या जागा याच. इतके दिवस या जागांवर कामं करणारी लोकं, परगांवचीं म्हणून, अर्थातच कमी झालीं. त्यांची मजूर म्हणून खाणीवर भरती झाली. नशीब !

हीं गांवची पोरं विलकुल नालायक होतीं. अख्खा दिवस पानं खाणं, शिग्रेटी ओढणं आणि तळपीवर ठिकठिकाणीं टाकलेल्या चहाच्या शापांत चकाट्या पिटणं यापलिकडे त्यांना कांहीं ठाऊक नव्हतं. ठाऊक करून घेण्याची इच्छा नव्हती. ह्या नोकरींत त्यांना सुख होतं कुठं ? त्यांचे डोळे तिकडे मुंवईला लागलेले. ओढ एक तीच ! गिरणींत, 'पोरटुसांत,' नाहीतर 'वेस्टीं'तल्या चाकरीची. थोरल्या भावाच्या नाहीतर भावोजीच्या कागदाची वाट वघत, इथं कंपनींत झक् मारीत ते दिवस काढीत होते. आणि यावद्दल महिना साठ रुपये पगार घेत.

उपकारच करीत. घरांत आईबापांवर, गांवांत ह्या थेरड्या गुरुजीवर. आणि म्हटलंच तर कंपनीवर ! कारण इथं गांवांत वसून हीं वेकार कामें करायला ते जन्मले नव्हते. खोटं नाही. पगार सरळ घरीं न्यायलामुद्धां लाज होई त्यांना. वर तळपीवरच तो उडवून टाकीत. रिकाम्या हातानं घरीं जात. पगाराचं काय केलंस वावा, म्हणून विचारण्याचीमुद्धां घरांत कोणाची टाप नव्हती. अच्चावच्च्या ओरडत, "गांवांत राहून साठ रुपयांत करतां येण्यासारखं सगळं केलं."

म्हणजे लांड्या तुमानी, अंगांत पट्ट्यापट्ट्यांचीं जर्किन, केसांना वासाचीं तेलं, झालंच तर रिस्टवॉचमुद्धां. तमा ख्वाब खूप करीत. मुंवईतहि लोकं करणार नाहींत असा.

तो वघूनच अण्णागुरुजी खुश होई. वरं वाटे त्याला. इतकीं वर्षं कुत्रीं कशीं वखावखा करीत गावांत उकीरड्यावर होतीं. तर या पोरांना त्यानं जवळ केलीं, मार्गाला लावलीं . . . आणि त्यांचं एकूण ठीक चाललं होतं. म्हातारा दाढी कुरवाळीत वघत राही. समाधानानं, भरलेपणानं.

लहरींत असला तर एखादा दिवस चेष्टा पण करी. डोळे वटारून हात झाडत पोरांच्या अंगावर येई. म्हणे, "भांचोद ! निकाल लागला रे ! एकाहून एक साहेब झालांत हां ! पायांत इस्टाकिण वुटं आन् इस्कींत केसांचा भांग. होय, मडमा शोधायलाच हव्यात आतां."

पोरं शेफारत. फिदीफिदी हंसूं लागत. एखादं पोरगं वाकी-च्यांना डोळा घालत हळूच म्हणे, "शोधायला आणीक कुठं निघा-लांत अण्णानूं ? आहेतच कीं हिथं—"

पाठीवरच्या लांबसडक वेणीला एक हिसका दिला. ओरडून म्हणाली, "मोठी झालें."

आणि मग ती चालूं लागली.

"म्हणूनच वेळीं अवेळीं एकट्यानें रानांत फिरणं बरं नव्हे. गांव पूर्वीचं राहिलं नाहीं. द्वारकानाथानं आवाज चढवला.

"हें मात्र खरं. म्हणून तर जातीनं वाळीत टाकलंय् आम्हांला." वासंतीचा टोमणा.

"जात गेली खड्डयांत !" द्वारकानाथ उलट ओरडला. त्या क्षणीं तरी जातीचा तो विचार करीत नव्हता.

वर खाणींत एव्हाना डंपर सुरू झाले होते. त्यांचं 'सूं सूं' चालू झालं होतं. तळाचं मॅंगनीज वर उपसलं जात होतं. आतां रात्रभर हेंच चालणार होतं.

डंपरांच्या या मूसाटांतहि दाजी नावराचा आवाज द्वारक्याला आज स्पष्ट ऐकूं येत होता. म्हातारा भलताच जोरांत होता.

धर्म्या रुद्रेला दाजी सांगत होता, "अरे दाजी जिंकला. हीं कलमं जगलीं धर्म्या."

"छा: ! काय विशात जगतात !" हा धर्म्या.

दाजीच्या तोंडून त्यानं बऱ्याच वेळां हें ऐकलं होतं. पण व्हायचं सगळं उलटं. अलिकडे तर कलमांना मुरुमाची माती घालण्याचं देखील त्यानं सोडलं होतं. कांहीं उपयोग नव्हता. तिकडे खाणीवर मॅंगनीजच्या मातीचे ढीग पडले होते. कोणाचं लक्ष नाही असं बघून ही माती धर्म्या पाटींत भरून आणी नि कलमांना घाली; वाडीची माती ती — निसत्त्व, नापीक. तर कलमं जगणं कसं शक्य होतं ?

"गाढवा, आतां तूं मला शिकव. काय ?" दाजी उसळला.

तसा धर्म्या अडखळला, गयावया करूं लागला, "दाजी, चूक झाली."

"आं !"

"म्या चांडाळानं ती — ती खाणींतली माती कलमांना घातली. नाहींतरी मुरूम घालूनसुद्धां मरतातच."

"भांचोद —"

पण दाजी नावर चिडला नाहीं, खवळला नाहीं. धर्म्याकडे लक्षहि नव्हतं त्याचं. म्हातारा कलमंच बघत होता. पाळंमुळं तपासत होता. असा न् तसा वाकून. आणि तो विचारांत पडला होता.

खात्री करून घेतली आणि दाजीच्या उत्साहाला मग सुमारच राहिला नाहीं. तो ओरडला, "गाढव — गाढव मी. धर्म्या तूं शहाणा —"

"छा: छा: !" धर्म्या कबूल करीना.

"अरे खरोखरच ! मी बसलों मुरूम घालीत. आणि भांचोद कलमांना हवं आहे लोखंड. काय ? ही मॅंगनीजची माती पडली तशीं हीं जगलीं. आधींचीं मेलीं. जा, सांग जाऊन तुझ्या अण्णाला म्हणावं तुझ्या महामायेचा सोन्याचा कळस कधीं येणार् तेव्हां येवो. पण भीष्मावर दाजीची ही आमराई बघ आधीं. हां ! ह: ह: हा:हा:"-

द्वारकानाथ तिथूनच परत फिरला. पुढं गेला नाहीं. ती वातमी दाजी नावराच्या कानावर घालायचा त्याला धीर होईना. म्हाताऱ्यानं ती ऐकूनच घेतली नसती.

• • •

'शॉर्ट कट !'





अनुक्रमणिका












अनुक्रमणिका




# नेमकं नाक नाहीं !



*....एखादी षोडषवर्षा रूपानें मोहक असावी. तिचे डोळे टपोरे असावेत, तिच्या भिवयाही रेखीव आहेत, तिची अंगकांतीही केवड्यासारखी आहे पण तिचं नाक थिंट असावें आणि तिच्या सगळ्या सौंदर्यावर बोळा फिरल्यासारखं घडावं. भारतीय क्रिकेटबाबत सध्यां नेमकं असंच घडलंय. तो सगळ्या बाजूंनीं चांगला आहे पण त्याच्यांत द्रुतगती गोलंदाज नाहीं !*

**नातवंडांना** आजी राक्षसाच्या गोष्टी सांगते. त्या गोष्टीचा शेवट ठरलेला असतो. तो म्हणजे शेवटीं राक्षस मरणार! तसा तो मरायलाच पाहिजे ! भारतांत कोणत्याही परदेशी संघाबरोबर कसोटी सामना सुरू झाला कीं त्या सामन्याचाही शेवट आतां ठरलेला असतो. तो म्हणजे शेवटी सामना अनिर्णित राहणार! तसा तो राहायलाच पाहिजे !

भारत-इंग्लंड ह्या नुकत्याच संपलेल्या मालिकेनें ह्या अस्सल भारतीय 'परंपरे'ची शान वाढवली. प्रेक्षकांना सुद्धां ह्याची आतां संवय झाली आहे कारण तशी ती नसती तर पांचही दिवस सामन्यांना जी गर्दी होत होती ती झाली नसती !

सामना अनिर्णित ठेवण्यासाठीं साधारणपणें कांहीं महत्वाच्या गोष्टी कराव्या लागतात —

१. शेवटचे दोन दिवस 'वेळकाढू' फलंदाजी करणें.
२. क्रीडांगणावरील हालचाली सुस्तपणें करणें.
३. मुळांत खेळपट्टीच विशिष्ट तऱ्हेनें तयार करणें — म्हणजे पांच दिवस सामना टिकेल ह्या सद्हेतुनें !

ह्यापैकीं कुठलीहि गोष्ट केली कीं सामना अनिर्णित ठेवून 'पत' राखतां येते. नुकत्याच संपलेल्या ह्या मालिकेंत हे गुण प्रकर्षानें झळकल्यामुळें सामना अनिर्णित राहणार नाहीं असं म्हणण्याची कोणाची बिशाद होती ?

आणखी एक गोष्ट प्रकर्षानें दोन्ही संघांत झळकत होती. ती म्हणजे दोन्हीही संघांत 'सामने' जिंकून देणारा, गोलंदाज नव्हता. इंग्लंडनें आणलेल्या तथाकथित द्रुतगति गोलंदाजांत 'ट्रुमन-स्टॅथम'चा वारसा सांगणारे कोणीही नव्हते. लार्टर आपल्या देहयष्टीप्रमाणें गोलंदाजींत उंची राखूं शकला नाहीं, म्हणून 'यष्टीचा' भेद तो करूं शकत नव्हता! प्राईसला स्टॅथमसारखी गोलंदाजी करायला खूप 'प्राईस' द्यावी लागेल. भारताची रडकथा हीच होती. रांजणे, देसाई हे त्यांच्या शरीरप्रकृतीप्रमाणें गोलंदाजींतही 'खुजे' ठरतात! त्यांतल्यात्यांत आपली थोडीबहुत अब्रू आपले फिरकी गोलंदाज राखून आहेत. पण त्यांच्यातही 'सामने जिंकून देणारे मन्कड-गुप्ते' दिसत नाहीत !

दि. श्री. कराडकर

फलंदाजींत दोन्ही संघ तुल्यबल होते हें एकदम कबूल. गेल्या वेळच्या डेक्स्टरच्या संघापेक्षां हा संघ फलंदाजींत श्रेष्ठ होता पण गोलंदाजींत कनिष्ठ होता. आमच्याकडे तर यंदा गोलंदाज फलंदाजी चांगली करतो कीं नाहीं हें आधीं ठरवून मग त्याची निवड केल्यामुळें अकराही खेळाडु फलंदाज म्हणून झळकत होते !

सामन्यांची ही परवड पाहून असं वाटलं कीं, इंग्लंड, न्युझिलंड व पाकिस्तान ह्यांच्याविरुद्ध आपण तीन दिवसाचे कसोटी सामने खेळायला काय हरकत आहे? ह्यामुळें खूप गोष्टी साध्य होणार आहेत. आपला पुष्कळ वेळ वांचेल. शिवाय इतर बरीचशी डोकेंदुखी कमी होईल, आणि मुख्य म्हणजे तीन दिवसाचा सामना असल्यामुळें हरण्याचा प्रश्नच नाहीं! अशा रीतीनें चारीही सामन्यापैकीं एकाही सामन्याचा जर निकाल लागला नाहीं तर पांचवा व शेवटचा सामना हा निर्णायक स्वरुपांत



अनुक्रमणिका

खेळण्यास काय हरकत आहे? हा पर्याय पसंत नसेल तर 'तालीम-शील्ड' प्रमाणें पटकांची मर्यादा ठेवा. १७५ पटकें झालीं कीं पहिला डाव संपला. ह्यामुळें हार-जीत निश्चित करतां येईल.

भारतांत अलीकडेच ह्या ज्या मालिका अनिर्णित रहात आहेत ह्याला कारण आमच्या इथल्या खेळपट्टया! खेळपट्टी तयार करणारे आमचे ग्राऊंड्समनसुद्धां खेळपट्टीची 'तवियत' पांच दिवस कशी राहिली हें छातीठोकपणें सांगू शकत नाहींत, आणि मग कानपूरच्या (एकुलत्या एक) जलद खेळपट्टीला 'ब्रेबॉर्न'च्या खेळपट्टीची अवकळा निर्माण होते! ह्या अशा खेळपट्टयांमुळें नाणेंफेक जिकली काय किंवा गमावली काय, एकूण परिणाम शून्य. इंग्लंड, ऑस्ट्रेलियांत नाणेंफेक जिकण्यावर सामन्याचं अर्ध यश सामावलेलं असतं. पतौडी इंग्लंड वा ऑस्ट्रेलियांत पांचही वेळां नाणेंफेक जिकला असता तर सामन्यांचा नूर बदलून कदाचित ३ विरुद्ध ० अशा बेतानें भारतीय संघ यशवंत झाला असता. दुसऱ्या देशांतील खेळपट्टीचं वैशिष्टय असं कीं ती शेवटपर्यंत गोलंदाजांना मदत करीत असते. उलट आपल्याकडे पहिल्या दिवशीं पहिले दोन तासच खेळपट्टी गोलंदाजांना अनुकूल असते. एकदां फलंदाजांनीं हे दोन तास निभावून नेले कीं पुढले सगळे फलंदाज 'अलबेल'! गोलंदाज चेंडू फाटेतों गोलंदाजी टाकतो पण खेळपट्टी त्याला दाद देत नाहीं. दिल्ली व कानपूरला खेळपट्टीनें ही करामत विशेषत्वानें करून दाखवली त्यामुळें गोलंदाजांची करामत निष्प्रभ ठरली!

अशा ह्या 'मुर्दाड' खेळपट्टीबद्दल एकटया ग्राऊंड्समनला जबाबदार धरतां येणार नाहीं. त्याला ती तशी घडवायला लावणारे क्रिकेटबोर्डावरील आमचे काहीं ढुढ्ढाचार्यही जबाबदार आहेत. 'सामना पांच दिवस चालला पाहिजे. पिचवर कांहींतरी क्लुप्ती करा बुवा.' असं झोकांत सांगणारे हे शासक, ह्यांचं कौतुक तरी किती करायचं? मध्यंतरी द्रुतगति गोलंदाज तयार करण्यासाठीं ह्यांनीं परदेशी द्रुतगति गोलंदाजांवर खणखणीत रुपयांची 'आदा' केली, परंतु ह्यामुळें नवीन द्रुतगति गोलंदाज निर्माण होण्याचा तर राहोच पण आमच्या रांजणे-देसाईची 'लेन्थ' सुद्धां सुधारली नाहीं. हे शासक ह्या कोडयाचं उत्तर देऊं शकत नाहीत.

हल्ली दैनंदिन तिकिटांचा तो रंगेल जमाना ही गेला. त्यामुळें अलिकडे दैनंदिन तिकिट-विक्री नसतेच. आतां गारुडयाप्रमाणें पैसे प्रथम जमवले जातात आणि मग खेळ दाखवला जातो! तब्बल पांच दिवस खेळ टिकेल अशी 'गॅरंटी' ह्या तिकिटांत असते जणूं! अनिर्णित सामना हा जो आजच्या क्रिकेटचा स्थायीभाव होऊन बसला आहे, तो जर अजून कांहीं वर्षे टिकून राहिला तर क्रिकेटच्या लोकप्रियतेवर निश्चित गंडांतर येईल.

वास्तविक पाहतां आपल्याकडील सगळया खेळपट्टया गोलंदाजांना अनुकूल अशाच तयार केल्या गेल्या पाहिजेत व त्यादृष्टीनें आपण ह्यापुढें तरी प्रयत्न केले पाहिजेत. द्रुतगती गोलंदाजांना अनुकूल अशी सबंध भारतांत एकच खेळपट्टी आहे आणि ती म्हणजे अहमदाबादची पण अहमदाबाद हे कसोटी सामन्याचं केंद्र नसल्यामुळें अशी खेळपट्टी कसोटी सामन्याचं ज्या ठिकाणीं केंद्र आहे त्या ठिकाणीं केली पाहिजे. अशाच तऱ्हेची दुसरी जलद खेळपट्टी ब्रेबॉर्नची आहे. म्हणजे नेहमीची नाहीं! जी खेळपट्टी 'प्रॅक्टीस' साठीं वापरली जाते ती मी म्हणतोय. ब्रेबॉर्नची नेहमीची खेळपट्टी ह्या खेळपट्टीप्रमाणें तयार करून घेतली पाहिजे.

ह्यावर्षी निवडसमितीचे खेळाडू निवडण्यासंबंधीचे सगळें अंदाज चुकले. इंजिनियर जखमी असतांनाही पहिल्या कसोटी सामन्यांत पहिल्या दिवशीं सकाळपर्यंत त्यालाच घेण्याचा निवड समितिचा अट्टाहास चालू होता. शेवटीं नाईलाजानें कुंदरनला त्यांनीं घेतलें. ह्या पठ्ठयानें १९२ धांवा काढून निवड समितीची अब्रू घेतली आणि वर पुढील चारीहो कसोटी सामन्यांसाठीं आपली जागा 'राखीव' करून ठेवली. आतां त्यापुढें दोघेही आपला 'फॉर्म' टिकविण्याचा आटोकाट प्रयत्न करतील. पण ह्या दोघांच्या अमहमिकेंत लाभ बोर्डाचा होणार आहे; कारण बोर्डाला नेहमी चांगला यष्टिरक्षक मिळेल आणि तोही आघाडीचा फलंदाज आहे असा!

ह्या हंगामांतील दुसरा "फाईंड" म्हणजे

## असा सामना पुन्हां होणें नाहीं!



पूर्वीच्या जमान्यांत मजा म्हणून एक विकेटचा क्रिकेटचा खेळ खेळला जाई. त्याला Single-Wicket Cricket म्हणत. पण हे सामनेहि चुरशीचें होत असत. अशाच एका सामन्याची ही एक गोष्ट. ऑक्सफर्ड विद्यापीठाचे दोन प्राध्यापक अ आणि ब यांनीं एकमेकांत क्रिकेट खेळण्याचें ठरविलें. ठरलेला दिवस उजाडला आणि अ व ब क्रिडांगणावर उतरले. ब ने नाणें जिकले आणि त्याने फलंदाजी पत्करली. १२ धांवा काढल्यावर अ ने त्याला बाद केलें. परंतु ह्या वेळेपर्यंत अ अगदी पार थकून गेला होता. इतका कीं तो सरळ आपल्या खोलींत जाऊन झोपला. परंतु मग असं ठरलं कीं ब ने नुसतीच गोलंदाजी टाकावी—अ फलंदाजी करतो आहे असं समजून! ब ने गोलंदाजी सुरु केली अगदी अचूक. एक, दोन, .... दहा चेंडू टाकले पण विकेट पडत नव्हती. बारावा गेला तरी विकेट पडली नाही. तेरावाहि तसाच गेला. आणि एकदम एकच जल्लोश उडाला. जो तो ओरडूं लागला—ब्रेव्हो! सगळे अ च्या खोलीत गेले आणि डाराडूर झोपलेल्या अ ला उठवून म्हणाले—'तूं सामना जिकलास. त्यानें तेरा चेंडू फुकट घालवले. तूं एक धावेनें जिकलास!"



अनुक्रमणिका

चंद्रशेखर. परंतु 'सामना जिंकून देणारा गोलंदाज' अशी किताबत त्याला द्यायला मी तयार नाहीं. चंद्रशेखरचा एक गुण वाखाणण्यासारखा आहे. तो म्हणजे त्याची लेन्थ चांगली आहे. पण सहाही चेंडू तो एकाच 'टीपें'त टाकतो. गुप्ते व बेनॉ सारखे भिन्न प्रकार त्यानें शिकून घेतले तर त्याचा दर्जा निश्चित वाढेल. मांजरेकरच्या जागीं आलेल्या हनुमानसिंगनें मात्र आपल्याला अस्सल (जुना) मांजरेकर दिला. किंबहुना कांकणभर जास्तच. कारण मांजरेकर पहिल्यापासून गवाळ क्षेत्ररक्षक म्हणून प्रसिद्ध आहे पण हा क्षेत्ररक्षणांतही 'हनुमान' ठरला ! परवां जातां जातां कॅप्टन स्मिथनेंही ह्याचें कौतुक केलें. पण आमच्या निवड समितीची दृष्टी किती दिव्य आहे पहा ? ह्या हनुमानाचा शोध त्यांना मांजरेकर जखमी झाल्यावर लागला ! बाळू गुप्तेची आठवण आम्हांला कानपुरला झाली; आणि रमाकांत देसाईला निवड-समितीचं "राजकारण" भोंवलं ! समितीची ही 'नीति' अनित्य आहे. मांजरेकर जखमी नसतांना हनुमानसिंगला घेण्याची त्यांना बुद्धि कां नाहीं झाली ? कधी कधीं 'पॅव्हिलियन' मध्यें बसून मांजरेकरला सामना बघूं द्या ! हीच स्थिती दुराणी-बोर्डेची होत चालली आहे. दुराणी-बोर्डेच्या केसांनांही धक्का लागणार नाहीं असा कांहीं सनातन नियम आहे कां ? त्या दोघांपैकीं एकाला 'पॅव्हिलियन' मध्यें बसवून बाळू गुप्तेला सहज घेतां आलं असतं. पण असं घडत नाहीं ! गुप्तेला मधून मधून घेतला असता तर हा 'बदल' स्वागतार्ह ठरला असता; आणि बोर्डे-दुराणीला विश्रांती मिळाल्यामुळें त्यांच्या गोलंदाजींत उत्साहवर्धक अचूकता दिसली असती ! बाळू गुप्तेसारखा लेगब्रेक गुगली गोलंदाज दोन्ही संघांतून एकही नव्हता. ह्यामुळें बाळू गुप्तेला दूर ठेवण्यांत बोर्डाची दूरदृष्टी खास नाहीं !

निवड-समितीचं मला एका गोष्टीचं आश्चर्य वाटतं. सगळ्या हंगामांत कृपालसिंगला सर्कसच्या 'विदूषका' प्रमाणें बरोबर मिरवण्याची काय जरूर होती ? कधीं पहिल्या अकरांत, कधीं बारावा, कधीं राखीव. सगळे प्रकार झाले. निवृत्तीची धांव लागलेल्या कृपालला हें उत्तेजन देऊन प्रसन्न सारख्या नवोदित व आशास्पद 'ऑफस्पिनर'ला आम्ही निराशवादी बनवीत आहोंत हें समितीला कसं कळत नाहीं ?

ह्या हंगामांत जवळ जवळ सगळ्यांनीं निराशा केली पण बोर्डे-दुराणीनें केलेली निराशा झोंबणारी आहे. बोर्डेवर भावी काळांत आपल्याला खूप जबाबदारी टाकायची आहे. दुराणी स्वभावतः Moody Player आहे. पण सबंध दौऱ्यांत त्यांच्यावर इतका भार पडला होता कीं शेवटच्या दोन कसोटी सामन्यांत दोघेही थकल्या भागल्यासारखे वाटले. क्रिकेटमधील भावी तरुण खेळाडूंनीं हें लक्षांत ठेवलं पाहिजे कीं सहा महिन्याच्या हंगामांत वेळोवेळीं विश्रांती घेतलीच पाहिजे.

दोन्ही संघांच्या कप्तानांबद्दल व त्यांच्या कामगिरीबद्दल फार लिहिण्यासारखं नाहीं. मतभेदाला वाव सांपडेल अशा चुका दोन्हीही कप्तानांनीं थोड्याफार केल्या. पण ह्यामुळें मोठा गहजब माजावा असा हा प्रकार नाहीं. 'नाणेंफेक जिंकणारा कप्तान' असा लौकिक पतौडीनें दौऱ्यांत मिळविला. पतौडीच्या रूपानें खूप वर्षांनंतर आपल्याला उच्च श्रेणींतला कप्तान मिळाला आहे. भविष्यांत हा संघनायक अजून खूप करून दाखवील. पांच पांच 'स्पिनर्स्' घेऊन कसोटी सामना खेळणं व त्या सगळ्यांचा अचूक उपयोग करून घेणं हें एक दिव्य आहे. पतौडी ह्या दिव्यांतून यशस्वीपणें बाहेर पडला.

ह्या दौऱ्यांत दोघांना बक्षीसं देण्याचा मला अनावर मोह होतो. कॅप्टन स्मिथ व कोलीन कौड्री. अहाहा, ह्या दोघांनीं किती 'नेत्रदीपक' धीमा खेळ केला ! मुंबईच्या सामन्यांत स्मिथ बॅट विसरून फलंदाजी करायला आला होता. मग 'पॅडस्' नें किती फटके मारणार ? कौड्रीच्या बॅटींत त्याचं पूर्वीचं तेज नव्हतं. ह्या दोघांचं अनुकरण इतरांनीं केलं त्यामुळें पाहुण्यांनीं कमालीच्या कूर्मगतीनें खेळ केला. कलकत्त्याला आम्हीं ३५० मिनिटांत २४१ धांवा केल्या तर पाहुण्यांनीं ५१८ मिनिटांत २६७ धांवा केल्या ! दिल्लीला ३४४ धावा करायला पाहुण्यांनीं ५१० मिनिटें घेतलीं तर मुंबईला ४०५ मिनिटांत २३३ धांवा त्यांनीं केल्या ! ! कौड्री चिकट फलंदाज आहे पण त्याला 'सामना जिंकणारा फलंदाज' म्हणून म्हणतां येणार नाहीं.

यंदाचा हंगाम गाजविणारा एकमेव भारतीय खेळाडू म्हणजे बापू नाडकर्णी होय. कानपूरच्या सामन्यांत एकाकी झुंज देऊन तो 'लढनेवाला बापू नाडकर्णी' ठरला ! त्यानें आपली अब्रू राखली ! शिडशिडीत बांध्याच्या बापूनें इतका Stamina कोठून आणला? म्हणून जो तो आश्चर्य करूं लागला. त्याच्या गोलंदाजीवर धांव कशी घ्यायची म्हणून इंग्लिश फलंदाज विचार करीत पण त्यांना तें कधींच जमलं नाहीं. बापू निर्धाव पटकें टाकतोच आहे ! बापूनें सबंध हंगामांत जी २१३ पटकें टाकली त्यांतील १२० निर्धाव होती. म्हणजें निम्म्याहून अधिक पटकें निर्धाव ! ! बापूच्या ह्या "तिढ्या" गोलंदाजिवर जास्त क्रुद्ध झाले ते ब्रिटिश पत्रकार आणि रागाच्या भरांत बापू "निगेटिव्ह" गोलंदाजी करतो असं ते लिहून गेले. अगदींच पोरकट आक्षेप !

इंग्लंडच्या वतीनें असे पराक्रम करणारे 'बापू' दोन होते. फलंदाजींत पारफिट व गोलंदाजींत टिटमस. त्यांच्या ह्या श्रेणींतील पराक्रमावरून इंग्लिश क्रिकेटमध्यें भविष्यांत त्यांना उज्ज्वल स्थान आहे हें निश्चित.

दोन्ही संघ क्षेत्ररक्षणांत 'नेटके' होते. पतौडी, मोर्टिमोर, काऊड्री व बोर्डे ह्यांनीं घेतलेले कांहीं झेल अविस्मरणीय असे आहेत.

भारतीय क्रिकेटवर कितीही लिहिलं तरी एक शल्य मनांत राहतंच ! तें म्हणजे आम्हांला शीघ्रगती गोलंदाज कधीं मिळणार ? त्याशिवाय आम्हांला अजून किती वर्षें काढावयाचीं आहेत ? वेगवान गोलंदाज मिळविण्यासाठीं बोर्डानें आतां देशभर एक Expedition सुरू केलं पाहिजे. वेगवान गोलंदाज शहरांतच मिळतो हा भ्रम आपण सोडला पाहिजे, खेड्यापाड्यांतून आतां आपली दृष्टी भिरभिरली पाहिजे. तिथें एकादा अमरसिंह, एकादा निसार भेटेल. त्याला तयार केलं पाहिजे. द्रुतगती गोलंदाज नसल्यामुळें भारतीय संघाची छाप जितकी पडायला पाहिजे तितकी पडत नाहीं. पूर्वींपेक्षां आपण फलंदाजींत प्रगती केली आहे. पूर्वींचे 'स्पिनर्स' हे फक्त 'स्पिनर्स' होते. हल्लीचे सगळे 'स्पिनर्स' हे "All-rounders" आहेत. क्षेत्ररक्षणांत आपण नेत्रदीपक यश मिळविलं आहे. लायक खेळाडूला 'चान्स' एकदम मिळाला नाहीं तरी कांहीं दिवसांनीं मिळतो. ह्या सगळ्या प्रगतींत अधोगती झाली असेल ती द्रुतगती गोलंदाजीची ! आपल्याला एक अमरसिंह किंवा एक निसार 'सांपडला' असता तर ?.. ....तर भारतीय संघाचं सगळं रूप पालटलं असतं. पण झालंय् काय कीं एखादी षोडश वर्षा रूपानें मोहक असावी, तिचे डोळे टपोरे असावेत, तिच्या भिवयाही रेखीव आहेत, तिची अंगकांतीही केवड्यासारखी आहे पण तिचं नाक थिटं असावं आणि तिच्या सगळ्या सौंदर्यावर बोळा फिरवल्यासारखं घडावं. भारतीय क्रिकेटबाबत सध्यां नेमकं असंच घडलंय. तो सगळ्या बाजूनें चांगला आहे. पण त्यांच्यांत द्रुतगती गोलंदाज नाहीं; म्हणजें नेमकं नाकच नाहीं ! !

●●●


तुमची पांढरी पातळें
टिनोपालच्या अधिक शुभ्रतेमुळें
चमकदार होतात.
Tinopal






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





**एस्. एस्. सींत** पहिला आलों तेव्हांची गोष्ट. आदल्या दिवशीं तार आली आणि मी हातभर उंच उडालों. धांवत धांवत वडिलां-कडे निघालों.

"अण्णा, मी पहिला आलों एस्. एस्. सींत."

"थट्टा करतोस होय रे ?"

"थट्टा नाहीं अण्णा. ही बघा तार."

वडिलांनीं तार वाचली आणि ते म्हणाले,

"शाबास ! शाबास ! मी तुझ्या मागें लागून अभ्यास करून घेतला त्याचं हें फळ—बरं ! तसा अभ्यास करून घेतला नसता तर काय झालं असतं रे तुझं ?"



## अनन्त तडवळकर

माझ्या पहिल्या नंबराचं श्रेय वडील आपल्याकडे ओढून घेत असतांनाच आई आली.

"काय झालं शंमू ?"

"मी पहिला आलों एस्. एस्. सींत."

"म्हणजे फक्त इथल्या शाळेपुरताच ना ?"

"नाहीं ग. सबंध महाराष्ट्रांत."

"हो कां ? बघ. त्या दिवशीं परिक्षेला जातांना माझ्या पायां पडून गेलास ना त्याचं हें फळ बरं !"

"कांहीं नाहीं हं ! मी याच्या मागें लागून अभ्यास करवून घेतला नसता तर हा पहिला आलाच नसता."

वडलांच्या बोलण्यावर आई पुन्हां कांहीं तरी बोलली. आईच्या बोलण्यावर वडीलहि पुन्हां कांहीं बोलले. साधारण पंधरा वीस मिनिटें अशी बोलाबोली झाली आणि त्यानंतर आई नेहमीप्रमाणें डोळे पुशीत स्वयंपाकघरांत गेली.

दुसऱ्या दिवशीं सविस्तर निकाल कळला. मला पांचशें रुपयांचीं बक्षिसें मिळालीं होतीं. त्यांत एक सुवर्णपदकहि होतें. लगेच वडिलांनीं रक्कम ताब्यांत घेण्याचा निर्णय जाहीर केला. वडील रक्कम आपल्याकडे घेणार हें समजल्याबरोबर आईनेंदेखील 'पदक मोडून दागिना घडवण्याचा' मनोदय बोलून दाखवला. आईवडिलांचे विचार ऐकून पैसे आणि पदकाची कांहीं परस्पर व्यवस्था लावतां येईल कां याचा विचार मी करूं लागलों.

दुसऱ्या दिवशीं सकाळच्या वेळीं एक उंचेला काळसर इसम दारीं आला. त्याला पाहून वडिलांनीं 'पुढच्या घरीं जा'ची सूचना केली.

"आपण मला ओळखलेलं दिसत नाहीं —" तो इसम बोलला, "मी इथल्या 'समाचार' पत्राचा वार्ताहर काशिनाथ घोणस. मला शंमुनाथ फुरसे यांची मुलाखत घ्यायची आहे."

मग वडिलांनी हंसून 'या आंत' म्हटलें. वार्ताहर दाराची चौकट






*...लैंगोटी नव्हे रे गधड्या ! मुंजींतला कोट. मी पण लनंचं धोतर, अन् मलमलचा कोट घालतो....मग आपण फोटो काढूं या....जा सांग त्या वार्ताहराला' ....पण वार्ताहर होता कुठें....?*

संभाळून आंत आला. डगडगणाऱ्या खुर्चीवर वेतानें बसला. गळणारें पेन रुमालानें पुसून झाल्यावर त्याच रुमालानें तोंड पुसूं लागला. मी त्याच्यासमोर स्टुलावर बसलों. वडील लोडाला टेकून बसले. आई कौतुकानें दारांत उभी राहिली.

"आपलं नांव काय शंभुनाथ ?" वार्ताहरानें विचारलें.

"शंभुनाथ एकनाथ फुरसे."

"माझंहि नांव सांगितलं पाहिजे काय ?"वडिलांनी मवेंच विचारलें.

"नको नको. जरूर नाहीं त्याची." वार्ताहरानें स्पष्ट सांगितलें. मला त्याचें कौतुक वाटलें.

"असूं द्या पण. घ्या लिहून. एकनाथ नागनाथ फुरसे."

वार्ताहरानें विचित्र नजरेनें वडिलांकडे पाहिलें. नंतर तो पुढें बोलूं लागला.

"वय काय तुमचं ?"

"कुणाचं ? माझं ?" वडिलांनीं विचारलें.

"तुमचं नाहीं. शंभुनाथाचं."

"माझं वय पंधरा वर्षें." मी बोललों.

"नाहीं, म्हणजे मला खरं वय पाहिजे."

"तें वय खरंच आहे."

"बरोबर आहे वार्ताहरसाहेब. तेवढंच आहे वय त्याचं." आई म्हणाली, "आम्हाला आठवतो तो दिवस. बरोब्बर पंधरा वर्षांपूर्वी शंभू जन्मला. इकडे शंभुचंद्र जन्मला आणि तिकडे यांना पोलिसांनीं पकडलं —"

"वाटलंच होतं तूं बोलणार म्हणून !" वडील उद्गारले.

"काय बोललें हो मी ! तें पांच हजाराच्या चोरीचं बोललें कीं त्यानंतर झालेल्या दोन वर्षं सक्तमजुरीच्या शिक्षेचं बोललें ? तुरुंगांत तुम्ही जेलरला ठोकल्याचं बोललें कीं पळून जाण्याच्या प्रयत्नांत शिक्षा वाढून मिळाल्याचं बोललें ? नुसतं पकडल्याचं तर बोलले !

"आतां काय शिल्लक ठेवलंय बोलायचं तुम्ही ? तेवढं उरलेलंहि सांगून टाका कीं !"

"आतां काय उरलं अण्णा ? सगळं झालं कीं सांगून !" मी बोललों.

"तूं गप्प रे."

वडील माझ्यावर ओरडले. पण त्यामुळें वार्ताहर घोणसच दचकला.

"टिपून घेतों हं." तो बोलला.

"काय टिपून घेतां ?" वडलांनीं विचारलें.

"तें —आपलं — ह्यांच्या वयाचं."

"हं. नुसतं वयच घ्या टिपून."

"हो. बाकीचं मला काय करायचं आहे टिपून घेऊन ? तें कां मला ठाऊक नाहीं ? आमच्याच पेपरमध्यें आलं होतं कीं पहिल्यांदा ? बातमी देणारा पण मीच —"

"तुम्ही होतां कां ते बातमी देणारे ?"

"हं. आतां पुढचा प्रश्न." वार्ताहरानें विषय बदलला, "तुम्ही कुठल्या हायस्कूलमध्यें शिकत होता शंभुनाथ ?"

"सरवटे हायस्कूलांत."

"बक्षिसं किती मिळालीं तुम्हांला एकूण ?"

"पांचशें रुपयांचीं. पण अण्णा म्हणतात कीं या पैशांत थोडी भर घालून सुमीचं लग्न करायचं !"

"मग त्यांत काय वाईट झालं ? तुमचं वय लग्नाचं नाहीं म्हणून. नाहींतर तुमचे सुद्धां लग्न केलं असतं या पैशांत. होय ना अण्णा ?"

"तुम्ही पुढें बघून प्रश्न विचारा." वडील रागानें बोलले.

"बरं शंभूराव, तुम्ही अभ्यास कुठल्या पद्धतीनें केला ? म्हणजे आहे काय, पहिला आलेल्या मुलाची अभ्यासाची पद्धत इतरांना म्हणे मार्गदर्शक होत असते. त्यांत तथ्य कितपत आहे हें मला ठाऊक नाहीं. तरीपण सांगा तुमची पद्धत."

"खरं सांगूं घोणस, मी अभ्यास केला तो माझ्या नेहमींच्या पद्धतीनेंच. म्हणजे पुस्तकावरून नोटस् काढणं, पुन्हां पुन्हां वाचणं, मुखोद्गत् करणं —"

"गाईडस् वगैरे वापरलीं नसतील तुम्ही —"

"मुळींच नाहीं. गाईडस्चा मला लहानपणापासून तिटकारा. मी सहा महिन्याचा होतों तेव्हांची गोष्ट. माझी बहीण माझ्याशेजारी मराठी दुसरीचा मार्गदर्शक वाचत होती. तर त्या वेळीं मी म्हणे तें पुस्तक लाथेनें उडवून लावलें."

"असं कुणी-सांगितलं ?" वार्ताहरानें विचारलें.

"आईनं."

"मग बरोबर आहे. पुढं सांगा."

"सांगतों. नोटस्वरून अभ्यास करण्याची माझी पद्धत असली



"सोन्यावर सरकारनं बंदी घातल्यानं वरपक्षानं हुंड्याची ही लांबलचक यादी पाठवलीय."

तरी पण एस्. एस्. सीचा अभ्यास मी पांचवीपासूनच सुरू केला —"

"तो कसा ?"

"एस्. एस्. सीच्या अभ्यासाचीं मूलतत्त्वें मला तशीं इंग्रजी पहिलींत म्हणजे पांचवींतच समजली. उदाहरणार्थः इंग्रजी विषय घ्या. पांचवीचं इंग्रजी आणि एस्. एस्. सीचं इंग्रजी यांत मूलतः भेद नसतोच —"

"म्हणजे ?"

"दोन्ही इंग्रजींत अक्षरें आणि शब्द तेच असतात. मांडणी फक्त वेगळी."

"म्हणजे हें लंगोटी आणि धोतर यांच्यासारखं झालं. मूलतत्त्व म्हणजे कापड एकच, पण आकार भिन्न."

"राइट ! पांचवीचा इतिहास काय किंवा एस्. एस्. सीचा इतिहास काय शिवाजी तोच आणि अफझुलखानहि तोच. जी गोष्ट इतिहासाची तीच भूगोलाची. एस्. एस्. सी ला लागलेला भूगोल म्हणून जगांतल्या नद्या बदलणार नाहींत कीं जमिनीवरचे पर्वत हवेंत उडून जाणार नाहींत. कांगोमधलं एलिझावेथव्हिले सिलोन-मध्यें येणार नाहीं कीं म्हैसूरमधला श्रवणवेळगोळा बुरुंडीरुआंडा-मधें जाणार नाहीं ! तोच ॲमेझॉन प्रकार, तेंच विषुववृत्त आणि तेच गोबीचं वाळवंट !"

"कोबीचं वाळवंट ?"

"गोबीचें म्हटलं मी ! एस्. एस्. सीला भूगोल घेतला नव्हता वाटतं तुम्ही ?"

"घेतला होता. पण आमच्यावेळीं भूगोल अगदी थोडा होता —

"असूं दे. पुढं ऐका. तेव्हां हीं मूलतत्त्वें लक्षांत आल्यावर मी समजलों — एस्. एस्. सी म्हणजे कांहींच नाहीं !"

"पटलं. आतां एक सांगा. हें पहिल्या नंबराचं श्रेय बहुतेक तुमच्या शिक्षकांचंच असेल. नाहीं ?"

"अर्थात् ! शिक्षकांमुळेंच तर मी इथवर येऊन पोहोंचलों. या यशप्रासादावर चढण्यासाठीं शिक्षकांनीं मला शिडीप्रमाणें साहाय्य दिलें —"

वरेंचसें बोलल्यावर वार्ताहर चारदोन शब्द टिपून घेई. या खेपे-सहि तसं करून त्यानें पुढें विचारलें,

"रागावणार नसाल तर एक प्रश्न विचारतों."

"विचारा."

"बऱ्याच मुलांच्या तोंडून मी ऐकलं कीं तुम्हाला परीक्षेचे प्रश्न आधी कळले —"

"कोण, कोण म्हणतो असं ?" वडील गरजले,

"येऊं दे माझ्यासमोर ! थोबाडून काढीन एकेकाला."

"तळपट होईल मेल्यांचं !" मेल्यांचं म्हणतानां आईचा स्वर चिरका झाला.

आईचा सूर आणि वडलांचा अभिनय एकत्र बांधून मीहि बोललों,

"वार्ताहर साहेव, कुठल्या मुलानं असं म्हटलं तेवढं सांगा, म्हणजे एकतीस अधिक एक असे बत्तीस दांत पाडतो साल्याचे !"

"कीं तुम्हीच म्हणतांय् ?" वडलांनीं वार्ताहराला विचारलें.

"म्मी — म्मी कशाला म्हणतों ? ज्यांना तुमचं यश पाहावत नाहीं अशी मुलं हेंच बोलणार !"

"पण नांव कां सांगत नाहीं तुम्हीं ?

"हं आतां पुढचा प्रश्न." वार्ताहरानें विषय बदलला, "शंभु-नाथ, तुम्हाला कोण व्हावंसं वाटतं ? खरं सांगितलं तरी चालेल हं."

"मला स्वतःला पायलट व्हावंसं वाटतं—" मी सांगूं लागलों, "पण आई म्हणते कीं तूं इंजिनिअर हो आणि वडील म्हणतात कीं गुरांचा डॉक्टर हो."

"तुमचे वडील नेहमी सोईच्या दृष्टीनें बोलतात वाटतं !' वार्ताहर उद्गारला.

"काय म्हणालांत?" वडील गरजले.

"हें विचारायचं राहिलंच" वार्ताहरानें दुर्लक्ष करीत म्हटलें, "तुम्ही आतांपर्यंत सगळ्या परीक्षांत पहिलेच आलां असाल, नाहीं शंभुचंद्र ?"

"कोण मी ?" वडिलांनीं विचारलं.

"शंभुचंद्रांना विचारलं मी !"

"मग ठीक आहे. नाहीं तर म्हटलं —"

"बोला शंभुचंद्र."

"बरोबर आहे तुमचं वार्ताहरसाहेब. आतांपर्यंत सगळ्या परि-क्षांत पहिलाच आलोय मी."

"माझा पण आला होता कीं पहिला नंबर, पापड लाटायच्या स्पर्धेत !" आई मधेंच बोलली.

"पापड ढापायचीसुद्धां स्पर्धा असते वाटतं !"

"पापड ढापायची स्पर्धा नव्हे कांहीं, पापड लाटायची स्पर्धा." मी खुलासा केला.

"आतां तें ओव्यांत दोनशे पापड लपवून नेल्याचं सांगूं कां ?" वडील हंसत म्हणाले.

"टिपून घेतों हं." वार्ताहर म्हणाला.

"काय ?"

"तें यांच्या पहिल्या नंबरांचं."

"माझ्या?" आईनें विचारलें.

"नाहीं. शंभुरावांच्या."

मग सगळं टिपण नीट जुळवून वार्ताहरानें तें कातडी बॅगेंत ठेवलें आणि तो विचारूं लागला,

"तुमचा एखादा फोटो आहे शंभुराव ?"

"आहे — आहे —" मी कांहीं बोलायच्या आंत वडील उठून आंतल्या घरांत धांवले. मीहि पाठोपाठ निघालों.

"हें पहा —" वार्ताहरानें मला थांबवलें.

"काय ?"

"फक्त तुमचाच हवा हं फोटो."

"बरं." मी वळून निघालों.

"शंभुदेव —" वार्ताहरानें पुन्हां हांक मारली.



अनुक्रमणिका

"काय ?

"फ्रेम केलेला नको हं."

"वरं —"

'आणि शंभुदेव —"

"नुसतं शंभू म्हटलं तरी चालेल."

"वरं शंभूच म्हणेन."

"सांगा काय तें."

"फोटो लहान हवा हं."

"वरं," मी आंत निघालों.

"आणि शंभू —"

"काय राहिलं आणखी आतां ?"

"लवकर या म्हणत होतों."

"आलोंच."

एव्हांना वडील आंत एका फोटोवरची धूळ झटकत होते.

"शंभ्या, हा आपला फॅमिलीचाच फोटो देऊं. येऊं देत सगळयांचे फोटो छापून."

"तो नको हं. त्या फोटोंत माझ्या नाकांत नथ नाहीं —" आई म्हणाली.

"नसूं दे —"

"आणि हें काय अण्णा, तुम्ही मला चक्क उचलून घेतलेलं आहे कीं या फोटोंत ?"

"त्यांत काय झालं मग ? पहिलीं आलेली मुलं आपला लहानपणींचाच फोटो देतात म्हटल !"

"शंभ्याचं कांहीं कां असेना. हा दुसरा फोटो द्या बघूं ?"

"अग पण त्यांत शंभू कुठाय ? आपण दोघेच आहोंत फक्त !"

"नसूं दे शंभू !"

"वा, वा ! असं कसं होईल ? वरातीच्या वेळीं नवरा मुलगा हा हवाच !"

"मग अप्पा, तो तात्यांनीं काढलेला फोटो द्या —" मी सुचवलें.

"अरे पण गद्ध्या, त्यांत मीं कुठं आहे ?"

"खरं म्हणजे फोटो माझ्या एकट्याचाच हवा आहे —" मी पुटपुटलों.

"फार शहाणा आहेस, गप्प बैस. नुसतं पहिला आल्यानं अक्कल वाढते असं समजूं नकोस —"

थोडा वेळ विचार करून वडील म्हणाले,

"नाहीं तर असं करूं. उद्यां आपण – उद्यां नको आजच. आज आपण सगळयांचा फोटो काढूं चांगला. तूं नथ घाल —"

"मी ?" मी विचारलें.

"तूं नव्हे रे गद्ध्या ! तुझ्या आईला म्हटलं मी ! तूं तो पायजमाशर्ट घाल —"

"कोण मी ?" आईनें विचारलें.

"तूं नव्हे ग ! शंभ्याला म्हणत होतों."

"तो पायजमा आखूड आहे." मी बोललों.

"फोटोंत पायाचा भाग येणार नाहीं. मी सांगतों तें ऐक मुकाट्यानं. पायजमाशर्ट घाल. त्यावर मुंजीतली लंगोटी घाल —"

"मुंजीतली लंगोटी ? पायजमा शर्टावर ?"

"लंगोटी नव्हे रे गद्ध्या ! मुंजीतला कोट घाल म्हणत होतों. मी पण वुलनचं धोतर, मलमलचा कोट घालतों मग आपण फोटो काढूं. उद्यांला देऊं वार्ताहराकडे. अं ? सांग त्याला जा."

चडफडत तें सांगण्यासाठीं बाहेर आलों.

वार्ताहर अदृश्य झाला होता.

●●●



# कांहीं तरीच मेलं एकेक तुमचं

--विठ्ठल रामजी भाटकर

आमच्या श्रीची तब्येत फार छान आहे. तो कधीं आजारी पडत नाहीं. ताप बीप त्याला कधीं माहीत नाहीं. पण एकदां त्याला बारीक ताप आला आणि सारा दिवसभर घरांत बसून राहावें लागलें. संवय नसल्यानें घरांत बसून बसून तो कंटाळून गेला. कांहींतरी 'करमणूक' पाहिजे म्हणून बसल्या बसल्या त्यानें एक कल्पना काढली. थोडी 'गंमत' करावी एवढाच आपला तसें करण्याचा हेतु होता असें त्यानें मला नंतर सांगितलें. पण प्रत्यक्ष प्रकार झाला असा.

आम्ही दोघें बाबांच्या शेजारच्याच खोलींत झोंपलों होतों. बाबांच्या रहस्यकथेची जुळवाजुळव हल्लीं अगदीं जोरांत चालली होती. रात्रीं बाबा झोंपल्यानंतर श्री हळूच उठून त्यांच्या खोलींत गेला. दिवा न लावतांच त्यानें बाबांना हलवून जागें केलें. बाबा पलंगावर उठून बसतांच त्यानें त्यांचा गळा पकडला आणि तो म्हणाला,

"रामचंद्रा, तुझीं शंभर वर्षे मरलीं. मरायला तयार हो."

आतां माझ्या वडिलांचें नांव रामचंद्र नव्हतें. पण एकूण प्रकार त्यांना बरा वाटला नाही. सगळें बळ एकवटून त्यांनीं श्रीला

हिसडा मारला आणि दरवाजाच्या दिशेनें धूम ठोकली. बाहेर जाऊन त्यांनीं आधीं दार धाडकन लावून कडी घातली व मग ओरडून ओरडून सारें घर जागें केलें.

असा प्रकार होईल अशी श्रीला मुळींच कल्पना नव्हती. तो परत येऊन डोक्यावरून पांघरूण ओढून गाढ झोंपेचें सोंग घेऊन पडला.

आम्ही सारे जागे होऊन बाबांच्या सांगण्यावरून त्यांच्या खोलींत गेलों. "आत्तां तो इथें होता. माझं नरडं धरून 'रामचंद्रा, तुझीं शंभर वर्षें भरलीं. मरायला तयार हो.' असं मला म्हणाला," असें बाबांनीं आम्हांला सांगितलें. श्रीला उठवून याचा खुलासा विचारतांच आपण त्या गांवचेच नाहीं असा अभिनय त्यानें केला. इतकेंच नव्हे तर, "झोंपण्यापूर्वी 'खून, पोलिस, रामचंद्र, गळा दाबून जीव घेईन. सोडणार नाहीं.' असें कांहींतरी बाबा वडबडत होते.–" असेंहि त्यानें सांगितलें. "तुम्हीच कांहींतरी तें 'डिटेटिव' लिहित बसतां आणि मग कांहींतरी स्वप्नं पडतात. कांहीतरीच मेलं एकेक तुमचं." असें आई बाबांना म्हणाली.

खरा प्रकार आम्हांला पटवून देण्याचा बाबांनीं खूप प्रयत्न केला, पण कुणाचाच त्यांच्यावर विश्वास बसला नाहीं. दुसऱ्या दिवशीं श्रीनें खरा प्रकार फक्त मलाच सांगितला. मला वाटतें, त्या रात्रीचा प्रकार खराच कीं केवळ स्वप्न याबद्दल अजूनहि बाबांच्या मनांत शंका असावी.

यानंतर थोड्याच दिवसांनीं दुसरा एक असा प्रसंग घडला कीं खरा प्रकार मी कबूल केला नसता तर आपल्याला खरो-खरीच हे भास होत असावेत असें वाटून बाबांच्या मनावर त्याचा विपरीत परिणाम झाला असता. कदाचित् त्यांना वेडहि लागलें असतें. काय झालें तें सांगतों.

वेस्टर्न रेल्वेवर बोरिवलीच्या पुढें दहिसर नांवांचें एक स्टेशन आहे व त्यापुढें मीरा-रोड नांवाचें एक छोटेंसें स्टेशन आहे. एकदां रात्रीं अंथरुणावर पडलों असतांना या स्टेशनाचा विचार सहज मनांत आला. पण त्याचें नांव मला आठवेना. आठवून पाहण्याचा खूप प्रयत्न केला. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. नांव अगदीं जिभेच्या टोंकावर होतें. पण लक्षांत येईना. 'जाऊंदे ! उद्यां आठवेल.' असा विचार करून मीं डोळे मिटले. पण तो विचार कांहीं मनावेगळा होईना. कांहीं केल्या झोंप लागेना. 'काय बरें त्या स्टेशनाचें नांव ?'

शेवटीं नाइलाज होऊन उठलों. बाबांनाच जाऊन विचारावें असा विचार करून त्यांच्या खोलींत गेलों. दिवा लावला. बाबा अगदी गाढ झोंपले होते. त्यांना उठवलें. ते दचकूनच उठून बसले.

"कोण आहे ? काय पाहिजे ?" त्यांनीं ओरडून विचारलें.

दुसरें कुणी नसून मीच आहे असें सांगतांच ते जरा सांवरून बसले.

"काय हवं रे आत्तां ? कशाला उठवलंस मला ? चांगली गाढ झोंप लागली होती." ते म्हणाले. (हें सांगायची अर्थात कांहीं गरज नव्हती. गाढ झोंप त्यांना नेहमींच लागत असे.)

यानंतर माझ्याकडून एक मोठी चूक झाली. वास्तविक 'बी. बी. ॲण्ड सी. आय्. रेल्वेचें दहिसरपुढील स्टेशन कोणतें तें मला सांगा. त्याचें नांव मला आठवत नाहीं आणि त्याच्या विचारानें मला झोंप लागत नाहीं.' एवढें मीं सांगितलें असतें कीं काम झालें असतें. त्यांनीं तें नांव सांगितलें असतें, माझ्या आचरटपणाची थोडी टिंगल केली असती, आणि "चल, झोंप जा आतां. आचरट कुठला. मला वाटलं खून बीन झाला कीं काय." असें कांहींतरी वडबडत ते परत झोंपीं गेले असते. पण कां कोण जाणे, मी तसें केलें नाहीं. मी त्यांना म्हणालों,

"बाबा, बी. बी. ॲन्ड सी. आय्. रेल्वेचीं 'म' नें सुरवात होणारीं स्टेशनें कोणतीं आहेत सांगा पाहूं."

या प्रश्नानें ते परत दचकले.

"'म' नें सुरवात होणारीं स्टेशनें ?" त्यांनीं विचारलें.

मला विनाकारणच थोडें अवसान चढलें.

"हो. हो. 'म' नें सुरुवात होणारीं स्टेशनें" मी म्हणालों.

"'म' नें सुरुवात होणारीं स्टेशनें – अं– मरीनलाइन्स, माटुंगा रोड, माहीम ––" ते पुटपुटले.

"छे ! छे ! त्या बाजूचीं नकों आहेत." मीं ओरडून म्हणालों. "पार्ल्याच्या ह्या बाजूचीं सांगा."

या वेळेपर्यंत बाबा पलंगाच्या दुसऱ्या बाजूस हळूंच उतरले होते. तेव्हां अर्थात त्याचें कारण माझ्या लक्षांत आलें नाहीं.

"या बाजूला 'मालाड' आहे," ते घोगऱ्या आवाजांत म्हणाले.

"तें नको आहे. तें स्टेशन बोरिवलीच्या पलीकडे आहे. दहिसरच्या पुढें. दहिसरच्या पुढचं स्टेशन कुठलं ?" मी आणखीनच ओरडून विचारलें.

"दहिसरच्या पुढें मीरारोड आहे." ते म्हणाले.

तें नांव ऐकतांच इतका वेळ माझ्या मनावर पडलेला ताण एकदम नाहींसा झाला. आणि "बस् ! बस् ! मीरारोड ! मीरा रोड !" असें मी ओरडलों.

तें ऐकतांच पलंगाच्या पलीकडे उतरलेले बाबा एकदम दरवाजाकडे पळाले. बाहेर जाऊन त्यांनीं धाडकन दार लावून घेतलें आणि ते ओरडूं लागले.

आतां सारा प्रकार माझ्या ध्यानांत आला. "रामचंद्रा, तुझीं शंभर वर्षें भरलीं. मरायला तयार हो." या प्रकाराशीं आजच्या प्रकाराचें किती साम्य आहे तें ताबडतोब माझ्या लक्षांत आलें. श्रीप्रमाणें गुपचूप जाऊन झोंपून राहावें असें माझ्या मनांत आलें. परंतु खरा प्रकार सांगणेंच बरें, नाहीतर बाबांच्या डोक्यावर विपरीत परिणाम होईल असा विचार करून मी तिथेंच थांबलों.



आईला आणि श्रीला घेऊन बाबा खोलींत आले. "काय वेड बीड लागलंय कीं काय तुम्हांला? तुमच्याच मानेवर भूत कसं बसतं?" असें कांहींतरी आई बाबांना म्हणत होती.

मी खोलींतच असल्याचें पाहून बाबांना जरा बरें वाटलें. "पाहिलास? तो पाहिलास? वेडयासारखा करत होता." बाबा आईला म्हणाले.

"कांहीं नाहीं ग आई. एका स्टेशनचं नांव मला आठवत नव्हतं. तें मी बाबांना येऊन विचारलं. तर ते ओरडत बाहेर पळाले." मी आईला सांगितलें.

यावर बाबा कांहीं बोलणार तेवढ्यांत आई म्हणाली,

"अरे, पण आत्तां रात्रींच तुझं त्या नांवावांचून काय नडलं होतं? उजाडणार नव्हतं का?"

आणि मग बाबांकडे वळून ती म्हणाली. "आणि विचारलं त्यानें तर त्यांत एवढं ओरडायला काय झालं हो? कांहींतरीच मेलं तुमचं एकेक. तें डिटेटिव लिहायचं बंद करा आतां. त्यानेंच डोकं फिरलंय् तुमचं.',

कांहीं न बोलतां बाबा पलंगावर झोंपले. आम्ही आपापल्या खोल्यांकडे निघून गेलों. जातांना 'तरी मी तुम्हांला सांगत होतें' असें कांहींतरी आई म्हणालीच. मी जातांना हळूंच बाबांकडे वळून पाहिलें आणि हंसलों. पण बाबा हंसण्याच्या मनःस्थितींत नव्हते.

सकाळीं चहा पितांना बाबा म्हणाले, "काय चमत्कारिक स्वप्न पडलं रात्रीं मला. हा बाळ माझ्या खोलींत आला आणि बी. बी. अँन्ड सी. आय्. रेल्वेच्या स्टेशनांबद्दल मला कांहींतरी विचारायला लागला. मी घाबरून बाहेर पडलों आणि सर्वांना जागं केलं. पुढें काय झालं तेंच आठवत नाहीं, च्यायला."

आम्हीं कांहीं बोललों नाहीं.

"आतां करावं तरी काय बाई या विक्षिप्तपणाला? कांहींतरीच मेलं तुमचं एकेक." असें कांहींतरी आई म्हणाली.

चहा पितांना बाबा सारखे माझ्याकडे पाहत होते.

●●●



## --सिनिक

**महालावरच्या** टेलिफोनऑपरेटरनें ऑफिसला वर्दी दिली. जयसुखलाल कामास निघाले. वेगवेगळ्या दालनांत माणसें नतमस्तक उभीं होतीं. केवळ चाहुलीनें दारें पटापट उघडत. 'नमस्ते', 'सलाम', 'good morning'च्या फैरी आश्रित आणि नोकर माणसांच्या तोंडून झडत होत्या. आर्जवी, नम्र आणि याचक चेहरे सस्मित होते. जयसुखलाल जिन्याच्या उतरत होते आणि दोन्ही बाजूचीं कुंडीतलीं फुलें उन्हात टवटवलीं होतीं. जसे जयसुखलाल मोटारी-जवळ आले तसे गाडीचे दार उघडत नामू 'नमस्कार' म्हणाला. आतांपर्यंत निर्जन वस्तीं-तून वाटचाल केल्यागत आलेल्या जयसुखलालानीं एक नजर नामूकडे पाहिले. त्यांच्या फुगीर चेहऱ्यावर रेषा आणि स्नायूंचें किंचित् आकुंचन झालें, जाड ओठ क्षणभर विलगले, पांढरे स्वच्छ टणक दांत चमकले आणि गाडीचें दार बंद व्हायच्या अगोदरच चेहरा पुन्हा निर्विकार झाला.

त्यांची मोटार विशाल अशा मार्गावरून जात होती. जयसुखलालांचा देह मऊ मऊ सीट-वर विसावला होता. तलम मर्सराईज्ड धोतराचा पुष्ट मांडयांना होणारा स्पर्श, अंगांतल्या रेशमी झब्ब्याची पिवळसर झिलाई, मनगटावरच्या घड्याळयाच्या पट्ट्याची सोनेरी लकाकी चकाकी, लालसर बोटावरची प्रकाश परिवर्तित करणारी हिऱ्याची अंगठी;—बसल्या बसल्या जयसुखलालांनीं आळीपाळीनें हें पाहिलें. पाहतां पाहतां ते हरखले. कमालीचे सुखावले. थोडे सुस्तावलेहि. गाडीचा वेग मंदावला म्हणून एकत्र आलेल्या डोळयांच्या पापण्या पुन्हा एकमेकापासून दूर झाल्या. गाडी अरुंद रस्त्यावरून एका चौरस्त्यावर आली होती. थवेच्या थवे चौरस्त्यावर थबकलेले होते. जयसुखलालांची नजर त्या माणसांवर किंचित काल स्थिरावली... माणसें, त्यांची दैना, असहाय्यता व पराधीनता, अतृप्त आणि संतप्त,—जयसुखलालांच्या मनांत असली कसली तर लाट उसळतांनाच पोलिसाचा हात खाली आला आणि त्यांची गाडी पुन्हा मोठया रस्त्यावर आली..... नेहमींच्या मस्त गतीनें धावूं लागली.......

—आता जयसुखलालांचें लक्ष्य नामू ड्रायव्हरकडे होतें. त्याच्या पातळ मानेवरचे पांढरे होणारे केंस फाटूं लागलेल्या युनिफॉर्मच्या कोटाशीं व त्याच्या निराश्रित झालेल्या दोऱ्यांशी सलगी करून होते......वास्तविक नामू त्यांच्यापेक्षां वयानें लहान होता.....गेलीं पंच-वीस वर्षे त्यांची चाकरी करत होता. त्यांच्या मर्जीतला आणि विश्वासांतला होता. एका दाराच्या गाडयांपासून आताच्या पासष्ट हजारांच्या गाडया त्यानें वाढत्या रुबाबानें आणि निश्चिततेनें चालवल्या.. चालवत होता. जयसुखलालांना अशा सारथ्यामुळें अंतरें तोडतां आलीं होतीं. काळावर मात आणि काळाशी साथ करता जी येत होती त्यांत सारथ्य महत्वाचें होतें. रस्त्यांचे आणि मालकाचे चढउतार गाडयांना पाहवले नाहींत. त्या बदलल्या पण नामू तोच होता. टिळा-अंगारा लावून बरोबर सकाळी साडेसातला हजर रहाण्यांत कधीं खंड पडला नाहीं. नोकर आले-गेले आणि वाढले. वितुष्ट आलें. मांडणें झालीं. कोर्टकचेऱ्या झाल्या. पण नामूच्या बाबतींत कांहीं झालें नाहीं. तो टिकला. मालक टिकले. रहाटी चालू राहिली... चालू होती. मालकापेक्षाहि नामू कमी बोलायचा. तोंडांत एका जबडयांत तंबाखूची गप्पी सदा कोंबलेली असायची.....

गाडीचें दार उघडलें. पुन्हा बंद झालें. नामू जयसुखलालांच्या मागोमाग गेला. त्यांच्या सुशीतल केबीनमध्यें शिरला. 'सरकार...' नामू उच्चारला. 'तीन वाजता—' जयसुख–











चुरचुरीत, खुसखुशीत आणि खमंग फरसाण

● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ●

## कांहीं कारण नसतांना उगीच हि : हि : हि : हो : हो : हो : करून हंसणें :

तिघी चौघी बायका मिळून गप्पा मारीत असल्या म्हणजे त्यांच्या गप्पांचा ओघ अव्याहत चालू राहतो आणि साधारणपणें दर दहा ते पंधरा सेकंदांनीं त्या एकदां 'हि: हि: हि:' करून हंसतात, पुन्हां चार पांच सेकंदांनीं 'हो: हो: हो:' करून हंसतात व मग पुन्हां तीन चार सेकंदानीं 'हो: हो: हो: हो: हो: हो: हो: हो:' मग पुन्हां दहा ते पंधरा सेकंदानीं 'हि: हि: हि:', मग पुन्हां हो: हो: हो:' व मग 'हो: हो: हो: हो: हो: हो: हो: हो:'. म्हणजे त्यांच्या या हंसण्याबद्दल माझें कांहीं म्हणणें नाहीं. मनुष्य हा हंसणारा प्राणी आहे. हंसणें हा एक चांगला व्यायामहि आहे. मी स्वतःहि एखादा चांगलासा विनोद वाचला किंवा ऐकला कीं अगदीं मनापासून हंसतों. तसेंच एखादा विनोदी प्रसंग घडला म्हणजे अगदीं 'हा: हा: हा:' 'हा: हा: हा: हा: हा: हा:' असें हंसतों. अगदीं मनापासून. हंसणारीं माणसें मला स्वतःला फार आवडतात. कांहीं कारण न घडतांहि एखादा माणूस गालांतल्या गालांत हंसला तरीहि माझें त्याबद्दल कांहीं म्हणणें नाहीं. मी स्वतःहि पुष्कळदां आपल्याच तंद्रींत असलों म्हणजे असं हंसतो. पण कांहीं कारण नसतांना उगीच ' हि : हि : हि : ' आणि हो : हो : हो : ' करण्यांत काय अर्थ आहे ? पुढील एकपात्री संवाद ऐका.

" अग, काल किनई मला विमलनीं फोन केला होता. " (हि : हि : हि :)

" ती काय बोलत होती तें किनई फोनवर मात्र नीट ऐकूंच येईना (हो:हो:हो:)•

" मग मी म्हणालें, अग मोठ्यानं बोल. मला किनई ऐकू येत नाहीं. (हो: हो : हो : हो : हो :)

ऐकलांत संवाद ?

आतां मला सांगा, ' विमलनें किनई कमलला फोन केला ' त्यांत हंसण्यासारखें काय आहे ? फोनवर बोललेलें पुष्कळदां नीट ऐकूं येत नाहीं. कधीं कधीं तर मोठ्यानें ओरडलें तरी पलीकडील माणसानां तें ऐकूं जात नाहीं. मला मान्य आहे. पण त्यांत ' हो : हो : हो : हो : ' करण्यासारखें काय आहे ? एकदां सुनंदाच्या कांहीं मैत्रिणी आल्या गेल्या आणि त्या सगळ्या मिळून अशाच खिदळून माझें टाळकें उठवीत होत्या. तेव्हां त्या साळकाया गेल्यानंतर सुनंदाला मी ' अमुक अमुक गोष्टींत हंसण्यासारखं काय आहे ग ?' असें विचारलें तेव्हां, ' अय्या, म्हणजे तुम्हांला विनोद म्हणजे काय तें सुद्धां समजत नाहीं ? तुम्ही किनई अगदीं बावळटच आहांत नाई !' असें उलट उत्तर देऊन मलाच बावळट ठरवून ती मोकळी झाली. (बावळट ! मी बावळट ! ! नाहींतर तें खरंच आहे म्हणा ! बावळट नसतों तर स्त्री नांवाच्या मूर्ख प्राण्याशीं लग्न करण्याचा बावळटपणा मी केलाच नसता. व्हॉट ?) या संबधीवर उपाय : वाचकहो, (हंसणाऱ्या बाईच्या तोंडांत एखादें मलें मोठें मुसळ कोंबण्याइतकें धैर्य अंगीं नसल्यास ) या संबधीवर कांहीं उपाय नाहीं. ●●●

"हीं क्षुल्लक भांडणं तुम्ही कोर्टाबाहेर कां मिटवित नाहीं मला समजत नाहीं", न्यायाधीश म्हणाले.

"आम्ही तेंच करत होतों, युअर ऑवर" आरोपी म्हणाला, "तेवढ्यांत पोलीस आले आणि त्यांनीं आम्हांला पकडून इकडे आणलं"

●●●

एका खेड्यांतील कोर्टांत एक खटला चालला होता. काय निर्णय द्यावा याबद्दल ज्यूरीच्या सदस्यांत बराच वेळ चर्चा होऊन फोअरमननें आपला निर्णय कळविला.

"गुना त्यानं क्येला असंल आसं आमास्नी वाटत नाय", तो म्हणाला. "कारन गुना घडला तवां गुना घडल्या जागीं त्यो नवता यांत आमास्नी काय बी संशय नाय. पन इक्तं मातुर आमी म्हनू कीं त्या मानसाच्या येकंदर लक्षनावरून आसं वाटताय की गुना घडला तवां त्यो तिथं आसता तर त्यानं त्यो नक्कींच क्येला आसता."

**—वि. रा. भाटकर.**

लालांनी दबल्या आवाजांत सूचना दिली आणि त्यापेक्षा दबलेल्या आवाजांत नामू त्यावर म्हणाला, ' प्रेमलताबाईंचे यजमान आज पहाटेच एका आठवड्याच्या रजेवर आले आहेत–! जयसुखलालांच्या छोट्या कपाळावर जरा बारीक संकोच दिसला. नामूच पुन्हां म्हणाला, 'आज महत्वाच्या कामाकरिता बंगलीवर तारा स्टेनोस बोलवून घ्यावे. सेक्रेटरी बरीच कामें तुंबून आहेत असं म्हणत होते...मी जेवून येतों....' आणि उत्तराची वाट न पाहता नामू गेला....

जयसुखलाला विचारांत पडले. अद्यावत पद्धतीनें सजवलेल्या केबीनमध्यें ते असे कधींच कांहीं निर्णय न घेतां बसत नसत. टेबलावरच्या काचेवर त्यांच्या दोन्ही हातांचीं कोपरें स्थिरावलीं होतीं आणि हाताचे पंजे हनुवटीकडून कानाकडे पसरले होते. त्यांनीं त्या काचेंत आपली छबी पाहिली. तीं जरा विस्कटल्यासारखी वाटली. ते तसेंच उठले आणि प्रसाधनगृहांत गेले. मोटारींत वाऱ्यामुळें केंस विस्कटले होते. रोजच्याप्रमाणें ते ठाकठीक करण्याचे राहून गेले: जयसुखलालांनीं फणीस हात घातला. आपला एकहि केंस अद्यापि पांढरा झाला नाहीं. या देहस्वीतेनं तें कमालीचे चुस्तावले. पण हा देहस्वीपणा लगेच.....आपलें नाक नकटें, आपलें कपाळ कोतें, डोळे बारीक आणि एकंदर चेहऱ्याची ठेवण सुरूपतेपासून अनंत योजनें दूर आहे,....ते स्वतःवर भयंकर नाखूश झाले. ●●●




*''दीपावली''च्या जानेवारी ६३ अंकांत सुरू झालेली व वाचकांच्या अंत:करणाचा वेध घेणारी कमांडर* **जेम्स कल्व्हर्ट** *यांची साहसमय प्रवासकथा.* **.** *बर्फाखालून हजारो मैल दूर प्रवास करून ११ ऑगस्ट ५८ ला उत्तर ध्रुवावर ते पोहोचले कसे व नंतर आल्फा या सरकत्या वर्फसंशोधन केंद्रापर्यंतचा त्यांचा प्रवास कसा झाला याची हकीकत आतां वाचा.*

**अनु. श्रीकृष्ण ठाकूर**

## ६ :

**प्रत्यक्ष** ध्रुवाच्या लगतच्या प्रदेशांत वर्फाचा थर जितका दाट असतो तितका इतर कुठें क्वचितच असेल. तिथं वर येण्यासाठीं एखादं उघडं तळं दिसतं का याचा तपास करण्यासाठीं आम्ही तिथें काहीं दिवस व्यर्थ खटाटोप केला. वॉल्टर विटमन्‌च्या वर्फ नोंदीच्या वहींत पुढील अनुत्साहित नोंदी दिसतील : 'अजूनपर्यंत कधीं न पाहिलेलं अमाप वर्फ...कोणत्याहि लहान मोठ्या आकाराची उघडीक नाहीं. वर्फ एकांत एक असं घट्ट चिकटलेलं. त्याच्या प्रत्येक वाजूला भयंकर जड अशा वर्फाच्या दरडी. पहिलीच उघडी ज़ागा– तळं दिसलं. पण आम्हांला वर येण्याच्या दृष्टीनें अगदींच लहान.......'

वर येण्याची प्रत्येक संभाव्यता कसोशीनें तपाशीत पांच नॉटच्या गतीनें आम्हीं वर्फाखालून सरपटत होतों. मंगळवारीं सकाळीं साडेआठ वाजतां पॅट गार्नरनें मला वर्फयंत्राकडे चटकन् वोलावलन्. तो मला म्हणाला, 'याचा आपणाला कांहीं उपयोग होईल कीं नाहीं तें तुम्हीं प्रत्यक्ष ठरवा. मात्र हें नजरेखालून घाला.'

एक लहानशी काळी रेपा टेपवर दिसत होती. ती इतकी लहान होती कीं पूर्वी इतक्या लहान रेषेचा आम्ही विचारहि केला नसता. पण आतां परिस्थिती सर्वस्वीं निराळी होती, म्हणून मी ती रेपा वारकाईन पाहायचं ठरविलं. नोंदी करणारांनां वोलावलं. आम्ही पुन्हा मागें वळून त्या तळयाखालीं आलों व त्या तळयाचा काळजीपूर्वक नकाशा तयार करण्यांत आला. तळं फार लहान होतं हें निश्चित्.

शेवटीं आम्ही त्या तळयाच्या मध्यविंदूवर, पेरिस्कोप पाण्यावर यावा इतक्या खोलींत स्केट उभी केली. जेव्हां पेरिस्कोप वर केला तेव्हां मला त्यांत पाहून धक्काच वसला. आमच्या प्रत्येक वाजूला वर्फाचे प्रचंड खडक उभे होते. कांवतकाठीं वर्फशिलांचे कांठ, दहा-दहा फूट उंची वर्फाचे एकमेकांवरील थर, राक्षसांप्रमाणें दिसणारे त्यांचे उघडलेले वर्फमय जवडे... आणि हें सारं आमच्यापासून अवघ्या कांहीं यार्डांच्या अंतरावर. 'पाणवुडी खालीं घ्या. पुढेंच निघूं या.' मी म्हणालों.

प्रत्येकाच्या चेहऱ्यावरील निराशा मला दिसत होती; पण माझा नाइलाज होता. त्या दिवशीं सकाळीं आणखी दोनदां आम्हीं असा प्रयत्न केला. उघडीक दिसतांच तिचा काळजीपूर्वक अंदाज घेणें, श्वास रोखून पाणवुडी वर घेणें, पेरिस्कोपमधून आजुवाजूचा अंदाज घेणें, आणि पुढें जाण्याचा निर्णय घेणें हें सारं त्रासदायक होतं, कंटाळवाणं होतं.

भोजनोत्तर थोड्याच वेळांत आम्हांला परत एक पाण्याचा पट्टा लागला. पेरिस्कोपनें तीच रडकथा परत एकवेळ गाऊन दाखविली.









अनुक्रमणिका

पण या वेळीं मी थोडा थांबलों. ध्रुवाच्या आसपास याहून मोठीं तळीं नसतीलच कदाचित्. तसं असेल तर या तळ्याची उपयुक्तता एकदाची पडताळून पाहणं आवश्यक होतं.

'बिल् १३ अगदीं सावकाश वोट वर घे.' लेफ्टनंट काउहिलला मी सांगितलं. लगेच कंट्रोल सेंटरमधील सर्वजण गप्प झाले; आणि तेथें उत्कंठापूर्ण वातावरण निर्माण झालं. सावकाशानं– अतिशय सावकाशीनं आम्ही वर आलों. प्रत्येक बाजूनें बर्फ आमच्यावर येऊन घांसतंय् कीं काय असं वाटे, तरीहि निकनें मला दिलासा दिला कीं वरती उघडं पाणी आहे.

आशेनं मीं पेरिस्कोपचा लोलक वर केला. वरती फक्त काळोख दिसत होता. आमच्या बाजूचं इथलं बर्फ इतकं जड होतं आणि इतकं काळं होतं कीं जणू काय मलामोठा मखमलीचा चुण्याचुण्याचा पडदाच टांगल्यासारखा वाटे. माझं हृदय धडधडत होतं, आणि तोंड कोरडं पडलं होतं. निकल्सन आणि काउहिल यांच्याकडे मी पाहिलं. दोघेहि बाहेरून शांत दिसत होते. अंतर्यामीं त्यांचीहि माझ्यासारखीच खळबळ चालू असेल का ?

शेवटीं पाण्याचा पृष्ठभाग लपलप करीत बर्फाच्या कडांना चाटतांना मीं पाहिला. पेरिस्कोपच्या सुरक्षिततेसाठीं आतां मी तो खालीं घेतला. 'डाव्या हाताला बर्फ आपल्या कितीसं जवळ आहे?' पेरिस्कोप खालीं जात असतांना मी विचारलं.

अंतराचं मोजमाप घेत असलेला आमचा वरिष्ठ सोनरमन लुइस क्लेनवीन म्हणाला 'पुष्कळ जवळ आहे कॅप्टन. पण याहून जास्त काहीं मी सांगूं शकत नाहीं.'

'आपण आतां पंचेचाळीस फूट पाण्याखालीं आहोंत.' बिल् काउहिल संयपणें म्हणाला. मी झटकन् पेरिस्कोप वर केला, आणि डाव्या बाजूच्या बर्फखंडावर नजर केंद्रित केली. तें आमच्यापासून दहा यार्डांपेक्षांहि कमी अंतरावर होतं. आतां काहीं करण्यासारखं नव्हतं. आम्ही सावकाशीनं त्याच्या दिशेनं तरंगत जात होतों. या सफरींत आम्ही प्रथमच बर्फावर आपटणार होतों.

लगेच माझ्या मनांत प्रोफेसर्स आणि रडार यांचा विचार आला. जर का रडार नादुरुस्त झाला तर आम्हीं या बर्फाळ प्रदेशांतून कधींच बाहेर येऊं शकणार नाहीं, तसेंच बर्फाखालीं तो दुरुस्तहि करतां येणार नाहीं. चटकन् मी पेरिस्कोप मागें वळवला. मी सोडलेला सुटकेचा निश्वास प्रत्येकानें ऐकला. आमच्या सुदैवानें स्केट जिच्यावर आपटणार होती त्या बर्फाच्या तटाला नेमकें त्याच ठिकाणीं एक वळण मिळालें होतें. जणू काय स्केटला इजा करायची नाहीं याचसाठीं त्याची योजना होती.

बर्फाच्या तटाला स्केट अगदीं हळू आपटली. मात्र काहीं इजा झाली नाहीं. स्केटची मधली 'मदार' फक्त तळ्याच्या काठाजवळ पाण्याच्या वर आलेली दिसत होती. त्या छोट्या वाकड्या तळ्यांत, एखादा व्हेल मासा पाण्यांत तरंगत असावा तशी स्केट दिसत होती. स्केट जेव्हां वर जाईल तेव्हां त्या तळ्याचा पृष्ठभाग स्केटला पुरेसा होईल का ? शंका होती.

थांबणं धोक्याचं होतं. पण हा जगाच्या अत्यंत उत्तरेकडचा प्रदेश. इथं यापूर्वी कोणतीहि पाणबुडी कधींच आली नव्हती. जर का आम्ही हा प्रयत्न सोडून दिला तर तो पुढें कित्येक वर्षेपर्यंत असा प्रयत्न कुणी करणारहि नाहीं. तेव्हां थोडाफार धोका पत्करून तिथें थांबायचं मी ठरविलं.

आम्ही थोडेसे पाण्याच्या वर आलों होतों. तशाच स्थितींत रहायचा मी निश्चय केला. अशीहि परिस्थितींत आम्हांला पुष्कळशा गोष्टी करतां येण्यासारख्या होत्या. आम्हांला आमच्या रेडियोचा उपयोग करतां येत होता. पेरिस्कोप, सेक्टरनं दिशा आणि अंतर यांचा हिशोब करतां येत होता, आणि हवा-नळी पाण्याबाहेर काढून आंत शुद्ध हवा घेतां आली असती.

निकल्सननें पेरिस्कोपचा तावा घेतला. ढगांतून दिसणाऱ्या सूर्याच्या कोनाचें माप घेण्यापूर्वी त्यानें छोटासा शीळ घातल्यासारखा आवाज केला. नंतर त्यानें पेरिस्कोप माझ्याकडे दिला. एका रेडिओ एरिअलला थर्मामीटर बांधून तें वर केलं होतं. त्याकडे मी पेरिस्कोपमधून पाहिलं. उष्णतामान शून्याच्या वर तेहतीस अंश होतं. बर्फ हलत होतं व आम्ही उभे होतों. तें तळं, थोडीशी कल्पना येते तोंच अगर कल्पना येण्यापूर्वीच बंद होईल अशी मला शंका आली.

नौदल खात्याला पाठवावयाचा संदेश मी झटकन् तयार केला. आम्ही बर्फाखालीं शिरल्यापासून त्यांना आमची कसलीच खबर नव्हती.

'भौगोलिक उत्तर ध्रुव प्रदेशावर ऑगस्ट ११ रोजीं पोचलों. यावेळीं ध्रुवापासून चाळीस मैल दूर असलेल्या तळ्यांत आहोंत. सर्व सुरक्षित'.

प्रमुख रेडिओमन डेल मॅक्‌कार्ड रेडिओच्या खोलींत खालीं बसला आणि त्यानें संदेश पाठवला.

'कोणतेंहि जहाज किंवा कोणतेंहि स्टेशन. ही अमेरिकेची 'स्केट' पाणबुडी आहे. आम्हांला संदेश पाठवावयाचा आहे.'

जवळ जवळ लगेच पुढील उत्तर आलें:

'हा रेडीओ मनीला आहे तुमचं बोलणं स्पष्ट ऐकूं येत आहे. आपण कृपया आपलं नांव परत सांगावं.'

फिलिपाइन्समधील अमेरिकन नौदल केंद्र होतं तें. मनीला स्टेशननें वॉशिंग्टनला पाठवण्यासाठीं आमचा संदेश घेतला आणि निकने 'आल्फा'या सरकत्या बर्फ संशोधन केंद्राला पाठवावयाचा संदेश माझ्याकडे दिला.

'कृपया तुमची नक्की जागा कोणती तें कळवा. तसेंच तुमच्या जवळपास असलेली तळ्यांची संख्या व आकार कळवा ही विनंती.'

'एवढ्यानं काम झालं पाहिजे.' मी म्हटलं व त्यावर सही केली.

मी फार थकलों होतों आणि निक सुद्धां दमल्यासारखा दिसत होता. गेल्या बहात्तर तासांत विचाऱ्याला अवघी चार तासद्धां झोप मिळाली नव्हती. मला त्याच्याहून थोडी जास्त झोप मिळाली होती, एवढंच.

'निक, तुला नि मला इथं झोपायला थोडासा अवधी मिळेल' मी म्हणालों. 'आल्फाकडून उत्तर येईपर्यंत आपण या तळ्यांत थांबू या.'

डेकवरील अधिकाऱ्यांना योग्य ते हुकूम देऊन मी माझ्या खोलींत गेलों आणि चौदा तास झोपलों.

आम्ही समुद्राखालून प्रवास करतांना जे दैनंदिन कार्यक्रम असतात ते सारे इथंहि चालू होते. अणुभट्टी व टरबाइन्स चालूं होतीं. स्वयंपाकघरांतील व्यवहार सुरळीत चालूं होते.

समुद्रपृष्ठावर येण्यासाठीं टॉर्पेडो उघडलेले होते, पण स्केट निस्तब्ध अशी पाण्यांत अर्ध्यामुर्ध्यावर उभी होती– बर्फाच्या दोन कड्यांमधें उभी होती. तिचा पेरिस्कोप, अँटेना आणि शुद्ध हवा घेण्याचा नळ आमच्या छोट्या







अनुक्रमणिका

तळ्याच्या पृष्ठभागावर एखाद्या कुंपणाच्या पट्टयांच्या वरच्या टोकांप्रम्पणें दिसत होते.

मी झोपलों असतांना आल्फा स्टेशनवरून उत्तर आलं होतं.

'गेल्या कित्येक दिवसांत नोंदी केलेल्या नाहींत. तेव्हां निश्चित कुठें आहोंत तें सांगतां येत नाहीं. पण बहुवा पंचाऐशीं रेखांश व एकशें छत्तीस अक्षांशावर असूं असें वाटतें. इथें पुष्कळ उघडीं तळीं आहेत त्यांतलं उत्कृष्ट तळं आमच्या मुख्य इमारतीपासून अवघं पन्नास यार्डावर आहे.'

वॉर्डरूममध्यें डेव्ह-ब्रॉइड बसला होता, त्याच्याकडे मी तो संदेश दिला. तो हसत हसत म्हणाला, 'त्यांचा त्यांनाच पत्ता नसलेलं हें ठिकाण आतां कसं काय शोधून काढायचं ? पण तें पन्नास यार्डावर असलेलं तळं जर आपण शोधून काढलं तर व्हार होईल नाहीं ? म्हणजे अगदीं त्यांच्या कंपातल्या वर आपण उमटूं !'

जगाच्या अतिशय उत्तरेकडील भागांत महत् प्रयासानें मिळविलेली जागा सोडायची तयारी १३ ऑगस्ट रोजीं सकाळीं साडेनऊ वाजतां सुरू केली. बर्फाच्या थरांतील आमची ती चौथी सकाळ. आणि तियें जरी अगदीं घरासारखं वाटत नसलं तरी आमची भीति नक्कीच कमी झाली होती. आम्हीं वर आलों त्यापेक्षां जास्त द्रुतगतीनं खालीं गेलों. आम्ही खालीं जात असतां त्या बर्फाच्या प्रचंड भितीकडे मी पाहिलं आणि इथें अशा कठिण जागेंत मला पुन्हा पृष्ठभागावर जाण्याचं धाडस होईल कीं नाहीं याचा विचार करूं लागलों. लौकरच हिरवट, निळसर आणि काळ्या छटा असलेल्या बर्फशिलांच्या भितीच्या बाजूनें आम्हीं आर्टिक महासागराच्या पाण्यांत गेलों आणि परत एकवेळ आल्फाच्या दिशेनं सुकाणूं फिरविलं.

आम्ही उत्तर ध्रुवावर पोचेपर्यंत फॅदोमिटरनें समुद्राच्या खोलीची नोंद केली होती. आम्हीं 'उत्तर युरेशियन' खोऱ्यावरून प्रवास केला होता. त्याची खोलीपृष्ठभागापासून अंदाजें १२,००० फूट होती. या महासागरांतील स्केटचं चित्र काढायचं झालं तर, सहा फूट उंचीच्या स्वयंपाकघरांत तक्तपोशीच्या खालीं दोन इंचावर काडयाच्या पेटींतील एक काडी लोंबकळत असल्यावर तें दृश्य जसं दिसेल, तसं असेल. वरची तक्तपोशी म्हणजे बर्फ, खोलीचा तळभाग म्हणजे महासागराचा तळ, आणि ती गरीब बिचारी काडी म्हणजे आमची स्केट. तें दृश्य डोळ्यांसमोर आणलं म्हणजे मानव आणि त्याची कृति, किती क्षुद्र आहेत, हें स्पष्ट जाणवतं.

आम्हीं ध्रुवप्रदेश सोडला न सोडला तोंच आमच्या फॅदोमिटरनं लोमोनोसॉव्ह उंचवटयांच्या बाजूनें किंचित् चढाव लागल्याची नोंद केली. आतां आम्हीं आल्फाच्या दिशेनं प्रवास करीत होतों तेव्हां फॅदोमिटरच्या ट्रॅव्हलिंग टेपवर लोमोनोसॉव्ह पर्वताच्या चढउताराचें चित्रण दिसूं लागलें. आमच्याखालीं असलेली ती अवाढव्य पर्वतश्रेणी माझ्या कल्पना-चक्षूंसमोर साकार झाली आणि त्यासमोर यःकश्चित् दिसणारी खुजी अशी स्केट—जणूं पोलादाचें बारकेंसें अंडेंच.

कोरडया जमिनीवर जर का हा पर्वत असता तर किती भव्य दिसता ! एक हजार मैलाहून जास्त लांब, दक्षिण अमेरिकेंतील आभाळांत झेपावणाऱ्या ॲंडीसप्रमाणें कुठें कुठें दहा हजार फुटांपेक्षां जास्त उंची. मात्र निरनिराळ्या उपकरणांच्याच सहाय्यानें केवळ अप्रत्यक्ष रीतीनें मानवालाच याचें अस्तित्व जाणवेल आणि त्याची रूपरेषा कळून येईल.

गुरुवारीं सकाळीं चहापानाच्या वेळीं स्केट ही आल्फा स्टेशनपासून तीस मैलांच्या आसपास असावी असा अंदाज आम्हीं केला. उत्तरध्रुव आणि अलास्का यांच्या जवळजवळ मध्यें आम्ही होतों. आम्हीं आतां ज्या प्रदेशांत प्रवेश केला होता त्याला विल्हजलमूर स्टिफेन्सननें 'प्रवेश—बंद प्रदेश' (Zone of Inaccessibility) असं नांव दिलं होतं. कारण या प्रदेशाला जहाजांनीं कधींहि स्पर्श केला नव्हता— उत्तरध्रुव प्रदेशांत क्वचित् जहाजें गेलीं असतील, पण इकडे नाहीं.

आम्हांला एक चांगल्यापैकीं तळं दिसलं आणि आम्ही बरोबर त्याखालीं येऊन थांबलों. बर्फ—शिलांच्या प्रदेशांत शिरल्यानंतर पहिल्याच दिवशीं दिसलं होतं तसलं हें तळं पेरिस्कोपमधून दिसलं. थोडयाच वेळांत स्केट तिथें वर आली.

ऑगस्ट महिन्यांत या बर्फमय प्रदेशांत वितळलेल्या पाण्याचे हजारों लहानमोठे जलसंचय दिसतात. त्यांची रुंदी कांहीं फुटांपासून छोटयाशा तळ्याएवढी असते, व खोली कांहीं इंचापासून तीनचार फुटांपर्यंत असते. त्यांतील पाणी अत्यंत ताजं असतं व त्याचा रंगहि नीलमण्यांप्रमाणें असतो.

मी 'पुला'वर उभा राहिलों, तेव्हां पांढऱ्याशुभ्र बर्फावर पसरलेली हीं हजारों माणिक मोतीं मला दिसलीं. दुसरीं मोठीं तळीं मुद्रां दिसत होतीं. या निळ्या जलसंचयाच्या पार्श्वभूमीवर तीं काळींशार दिसत होतीं.

बाहेर येऊन सर्वांना हें दृश्य पहातां यावं म्हणून डेकचे दरवाजे उघडावयास मी सांगितलं.

जहाजावरील माणसं डेकच्या दरवाजांतून बाहेर आलीं व स्केट ज्यांत उभी होती, त्या तळ्याचं चकाकणारं निळसर पाणी पाहाण्यांत गर्क झाले. त्यांच्या चेहऱ्यावर आनंद आणि उत्साह उचंबळूं लागला. क्वॉर्टर मास्टर जॉन मेडाग्वीया हा ठेंगणा, काळसर, विनोदी तरुण होता. तो म्हणाला 'कॅप्टन, ही तर पोहण्याचीच जागा दिसते आहे.'

'आम्ही आतांच पोहून आलों—आतां तूंच पहिला.' मी मोठ्यानें सांगितलं. क्षणार्धांत चौघांनीं जॉनला गराडा घातला व ते त्याला थंडगार पाण्याच्या दिशेनें उचलून नेऊं लागले. मेडाग्वीयानें प्रतिकार केला—आरडा ओरडा केला तेव्हां मग त्यांनीं त्याला खालीं उभा केला व सारे हंसूं लागले.

खालीं वॉर्डरूममध्यें टेबलावर मोठा नकाशा पसरून निक् त्यावर कांहीं नोंदी करीत होता. स्केटची सध्यांची जागा निश्चित करून त्यापासून अंदाजें दहा इंच लांबीची एक पेन्सील लाईन काढली होती. त्या रेषेकडे बोट दाखवीत निक म्हणाला 'आल्फाची वाट विशेष त्रासाशिवाय सांपडली......'

मी म्हटलं 'पण त्या रेषेवर आल्फा किती दूर आहे ? एका चौरस मैलांत अंदाजें पांच तळीं आहेत अणि फक्त एकच तळं त्यांच्या कंपानजीक असणार.'

आम्ही भोजनास बसलों न बसलों तोंच आल्फा वरून संदेश आला :

"आल्फाच्या अगदीं जवळच्या तळयात एक मोटर बोट सतत चालू ठेवीत आहोंत."

अनुक्रमणिका





आम्हांला दूरवरच्या मोटार-बोटचा आवाज ऐकूं आला तर – आमचा मार्ग सोपा होता. थोड्याच वेळांत मी सोनरमन लुइस क्लेइनले-नला विचारलं कीं मोटार-बोटचा आवाज वर्फाखालून किती दूरपर्यंत ऐकूं येईल ?

त्याच्या चेहऱ्यावर समजल्यासारखं हास्य पसरलं. 'कॅप्टन, आपणांला तो आवाज बिल-कूल ऐकूं येणार नाहीं. तो ऐकण्यासाठीं आप-णाला पाण्याखालीं गेलें पाहिजे. आणि मग पांच मैल दूरपर्यंत मोटार-बोटचा आवाज आपणांला ऐकूं येईल.'

जेवण झाल्यावर ताजी हवा हवी म्हणून मी ब्रिजवर गेलों. विटमन् आणि ला फॉंड हे नेहमीप्रमाणें बर्फाचे आणि पाण्याचे नमुने गोळा करीत होते. थोड्याच वेळांत ते माघारी आले. त्यांना जेवायला यायला उशीर झाला होता. पण त्यांच्या चेहऱ्यावर उत्साह ओसंडत होता. त्याच रबर-बोटमधून मीहि मला वर्फापर्यंत पोचवायला खलाशांना सांगितलं. त्या तरंगत्या बर्फावर थोडासा व्यायाम आणि एकांत लाभावा म्हणून वर्फाच्या एका टेकडी-वर चढून मी पलीकडे गेलों; आणि स्केट मला दिसेनाशी झाली. स्केटच्या इंजिनांचा चोवीस तास चालणारा आवाज आतां दूर असल्या-. मुळें तिथली निःस्तब्धता फार जाणवूं लागली छोट्या छोट्या जलसंचयांतून वितळलेलें पाणी होतं तें हवेइतकं पारदर्शक होतं; आणि त्यांच्या तळाला सुंदर, मोहक असा निळसर रंग प्रतीत होत होता. माझ्या मनांत विचार आला, याच्या तळाशीं काय बरं असेल ? एक फूट खोलीचं पाणी, कदाचित् नऊ फूट वर्फ थर आणि त्याखालीं हजारों फूट खोल पाणीचपाणी– काळं–वर्फाळ समुद्राचं पाणी–अगदीं खालच्या तळापर्यंत. समुद्राचा हा तळ इतका दूर होता कीं, तिथें निश्चित काय आहे हें मानवाला कधीं कळणारहि नाहीं. त्या समुद्रावरील हें वर्फ इतकें क्षुद्र आहे कीं जणुं पिंपांत जमलेल्या पावसाच्या पाण्यावर जणूं काय आलेला कचऱ्याचा तवंगच.

वर्फाच्या छोट्या टेकडीकडे मी चाललों होतों. पायाखालचं वर्फ उकडीसारखं मुसमुशीत लागत होतं. चालण्याच्या थोड्याशाच श्रमांनीं मी घामानें ओला झालों होतों. जेव्हां मी विश्रांतीसाठीं थांबलों तेव्हां वातावरणांतील थंडी कपड्यांतून माझ्या शरीरापर्यंत आणि शरिरांतून आंत हाडांपर्यंत पोंचली. विचारे डॉ.लॉंग आणि त्यांचीं माणसं! 'जेनेट' वरचीं हीं माणसं १८८१च्या उन्हाळ्या-मध्यें, बरोबर तीन होड्या ओढीत, हें वर्फ तुडवीत कशीं गेलीं असतील ! खरोखरीच स्केटवरच्या माझ्या सहकाऱ्यांवर तसा प्रसंग आला तर काय बरें स्थिती होईल ? डी लॉंगच्या माणसांबरोबर निदान कुत्रे, कुत्र्यांनीं ओढायच्या गाड्या नि उबदार कपडे होते. कोलंबसविषयीं विल्यम बोलीथो यांनीं काढलेले उद्गार मला आठवले.' कोलंबसचा मोठेपणा म्हणजे, इतर सर्व संशोधकांप्रमाणें जिथें त्यानें सारीं धाडसं केलीं– तो प्रदेश त्याला सर्वस्वी परका होता.'

आम्ही या प्रदेशांत सर्वस्वी परकी आहोंत. मी उभा होतों तिथपासून चारपांचशें पावलांवर तळघांत तरंगणाऱ्या त्या काळ्या पाणबुडीच्या आधाराशिवाय इथें चार आठ तासांपलीकडे कहीं आम्हांला राहतां येणार नाहीं. मी आमच्या नेहमीच्या वातावरणा-पासून इतका दूर आहें कीं अंतराळयानांतून चंद्रावर उतरणाऱ्या पहिल्या मानवाला त्यावेळीं जसं काहीं वाटेल तसंच या वेळीं इथें मला वाटतं आहे.

एकाएकीं मला एकटं एकटं वाटूं लागलं. मी आमच्या तळ्याकडे घाईघाईनं गेलों व होडी मागवली. मी जेव्हां आमच्या जहाजांत पाऊल ठेवलं तेव्हां निराळ्या विश्वांत आल्या-सारखं मला वाटलं. ऊब–प्रकाश–गोंगाट आणि स्नेह सर्वत्र भरला होता. घर घर म्हणतात तें हेंच.

स्केट जशजशी खालीं जाऊं लागली तसतशी तिच्या टाक्यांतून हवा बाहेर पडूं लागली व त्याचा 'हिस्स्' असा आवाज होऊं लागला. हळूहळू तें शांत पाणी स्केटच्या डोलकाठीवर चपक् चपक् करून आपटूं लागलं व शेवटीं स्केट पाण्यांत दिसेनाशी झाली. परका माणूस निघून चालला होता.

स्केट सावकाशीनं पुढें चालूं लागली. तिचा प्रवास आरामशीर चालूं झाला. ऐक-ण्याचीं उपकरणं कानाला लावलेल्या क्लेन-लिनच्या चेहऱ्यावर हळूहळू हास्य दिसूं लागलं. कानाला लावायचीं ऐकण्याचीं उपकरणं त्यानें माझ्याकडे दिलीं. अंबुक 'पुट् पुट् पुट् पुट्' असा आउट बोर्ड मोटारचा तो आवाज होता हें खास. साधारणपणें आमच्या समोरच्या दिशेनं तो येत होता.

वर्फ-यंत्रावर अल् केलन्ला कितीतरी तळीं आढळत होतीं. स्केटला वर जायला सोयिस्कर होण्याइतपत तीं निश्चित मोठीं होतीं. पण आतां आम्हांला वाटेल तें तळें नको होतें. हजारों तळ्यांपैकीं निश्चित असं एकच तळं आतां आम्हांला हवं होतं. आउट बोर्डचा आवाज हळूहळू मोठमोठा होत होता. पण तो आवाज निश्चित अमक्या दिशेनं येतो आहे असं सांगणं क्लेनलिनला जड जात होतं. त्याच्या मोजणीमध्यें डावा–उजवा, डावा–उजवा असे हेलकावे होऊं लागले. त्यानें काढलेल्या रेषांकडे पाहतांना निकच्या चेहऱ्यावर चिंता दिसूं लागली.

मग अनपेक्षितपणें आवाज बंद झाला. आम्ही सर्व दिशानीं बारकाईनं ऐकण्याचा प्रयत्न केला पण व्यर्थ. मात्र एक शक्यता होती. आम्ही आल्फाच्या पुढें निघून गेलों असावेत आणि स्केटची तक्तपोशी अत्यंत जाड धातूची असल्यामुळें अगदीं डोक्यावरचा आवाज आम्हांला ऐकूं आला नसेल. लगेच स्केट तिथें थांबली व आपलं तीन हजार टनांचं ओझं घेऊन मागे फिरवीत सावकाशीनं चालूं लागली. तेव्हां परत एकवेळ पुट्पुट् पुट्पुट् असा आवाज इअर–फोनमधून ऐकूं येऊं लागला.

आतां आम्हाला अतिशय सावकाशीनं वर जायला हवं व ऐकूं येणारा आवाज बंद होतांक्षणींच कोणतं तळं डोक्यावर येतं हें शोधायला हवं. परत आवाज बंद झाला, पण वर्फ यंत्र मात्र डोक्यावर फक्त घट्ट बर्फच असल्याचं दर्शवीत होतं. आम्ही सावकाशीनं वाजूला सरकलों व दुसऱ्या दिशेनें निघालों. आतां क्लेन लिन् म्हणाला कीं यावेळीं जो आवाज येतोय् तो चारी बाजूंनीं येतो आहे. तेव्हां आम्हीं फार दूर नाहीं.

'डोक्यावर उघडं पाणी आहे' तो ओरडला. पण तें तळं स्केटच्या लांबीला पुरण्यासारखं नाहीं हें लक्षांत येतांच त्याच्या उत्साहावर विरजण पडलं. तें तळं हें नसणार. कारण तें तळं मोठें आहे असं त्यांनीं सांगितलं होतं.

काहीं का असेना, आम्हीं त्या जागेवर खूण केली व मागें वळून तेथून दुसऱ्या दिशेनें जावयास निघालों. आणि यावेळीं जें तळं लागलं त्यांत भरपूर–भरपूर उघडी जागा होती.

स्केट वर नेण्यासाठीं योग्य त्या सूचना मी केल्या आणि आज्ञाधारकपणें स्केट सावकाशीनं उजवीकडून वर आली.

आमचा अंदाज बरोबर होता. आम्ही वर येत असतां पेरिस्कोपवर होणारी पाण्याची चपक् चपक् दिसत होती. वर्फ दोन्ही बाजूंना सारख्या अंतरावर होतं. मला पुढें किंवा मागें कुणीच दिसेना.

हळूहळू पेरिस्कोप पाण्यावाहेर आला. आमच्या आजुबाजूच्या वर्फावर करड्या रंगाच्या छोट्या झोपड्या दिसत होत्या. एकउंच रेडिओ अंटेना त्यांच्यावर दिसत होता. आणि पुष्कळ अंतरावर मागच्या बाजूला राडार होता. त्याचेजवळ एक उंच खांब होता व त्यावर अमेरिकेचा ध्वज होता.

हें आमचं तळं, आम्ही कल्पना केल्याप्रमाणें लांब होतं, रुंदीला मात्र कमी होतं पण ठीक होतं. आणि त्याच्याकडेला एक छोटी आउट बोर्ड मोटार बोट रिंगण घालीत होती. तिच्या-वरील मनुष्य आपली हॅट जोरजोरानें हलवीत होता. (क्रमशः) ☆







आगगाडींतून प्रवास
करीत असतांना
# काळजी घ्या !



पेटती सिगरेट
फेकण्यापूर्वी ती
विझवा किंवा
राखदाणी
(ॲश् ट्रे) वापरा.

•

डब्यांत स्टोव्ह
पेटवूं नका



आगगाडींत असतांना
## सुरक्षिततेसाठीं
## आगप्रतिबन्धक नियमांचें
पालन करा.



ज्वालाग्राही पदार्थ
डब्यांतून नेऊं नका



जीवन व वस्तू याचा नाश करणारी भयानक आग लागण्यास निष्काळजी-पणा कारणीभूत होणे शक्य असतें.



प्रवासांतील सुरक्षिततेच्या हेतुने मध्य रेल्वे द्वारा प्रकाशित

MARATHI




● 'माणूस' ● 'ऐसा गा मी ब्रह्म'

## 'माणूस'

**गेल्या** पंधरा वर्षांपासून श्री. तल्हार लिखाण करीत आहेत. तीन-चार कथासंग्रह निघावेत इतक्या कथा त्यांनीं ह्या काळांत लिहिल्यात. नागपूरच्या 'सुपमे'पासून तों 'छंद-सत्यकथे'तून ते येऊन गेलेत. ग्रामीण भाषेच्या-वऱ्हाडी बोलीच्या-संदर्भात नांव घ्यावें अशा कथा त्यांनी दिल्यात. आणि आतां त्यांची ३८४ पानांची 'माणूस' कादंबरी प्रसिद्ध झालेली आहे.

इतकें विपुल लखाण केलेल्या लेखकाची ही कलाकृति! साहजिकच तीबद्दल वाचकांच्या कांहीं अपेक्षा असणार. आणि ह्या अपेक्षा पुऱ्या होणार म्हणून वाचक हीं येवढी मोठ्ठी कादंबरी वाचणार.

पण तल्हार असल्या कांहीं अपेक्षा पूर्ण करूं शकतात कां? एक जीवंत कलाकृति आपण अनुभवीत आहोंत ही वाचकाची भावना होते कां? कांहीं वेगळें-कांहीं आगळें वाचल्यानें लागून राहणारी चुटपुट जागवणारी हुरहूर ही कादंबरी निर्माण करूं शकते कां?......करीत नाहीं. पण हें असें कां व्हावें?

—जीवनाचा एक मोठा कालखंड कादंबरींत वेंचण्याचा लेखकाचा प्रयत्न असतो. ह्या कालखंडांतले व्यक्तींचें जीवनसंघर्ष कादंबरींत चित्रित झालेले असतात. लेखकाच्या व्यक्तित्वाला फोडून हें प्रसंग यायचे असतात. किंबहुना हे 'फुटून निघणेंच' लेखकास लिहिण्यासाठीं प्रवृत्त करीत असतें. पण 'माणूस' मध्यें हें कुठें जाणवतच नाहीं. रिक्षा चालविणारा शंकर आणि जगण्याकरतां त्याचा चाललेला संघर्ष हा वास्तविक माझ्या मताप्रमाणें 'माणूस'-मधून यावयाचा विषय. आणि रफीक, रफीकची वुढ्डी, शंकरची दुसरी वायको, शंकरला लोळवूं पाहणारा त्याचाच एक धंदाभाई, पंक्चरवाला व त्याची वेश्या, रिक्षावाल्यांच्या जीवनावर लिहिण्याची उमेद वाळगणारी प्राध्यापिका वगैरे सारीं माणसें ह्या जीवनसंघर्षात शंकरला पूरक म्हणून येणाऱ्या व्यक्ति! पण तल्हारांचें नेमकें ह्याच गोष्टींकडे दुर्लक्ष झालेलें आहे. आणि शंकर व रफीक ह्या दोघांतली मैत्रीच कादंबरीचें प्रमुख आकर्षण वनलें आहे. प्रमुख उद्दिष्ट वनलें आहे.

अगदीं कादंबरींतलें उदाहरण द्यायचें झालें तर तल्हारांची स्थिति रिक्षावाल्यांच्या जीवनांवर (सामान्यांच्या जीवनावर) लिहिण्याची श्रद्धा वाळगून त्यांना समजावून घेऊं पाहणाऱ्या प्राध्यापक पत्नीसारखी झालेली आहे. अन्यथा संवादांच्या लकवींतून शंकर आणि रफीक यांच्या प्रमाणभूत मैत्रिचित्रणांतलें तेंच तेंच वैशिष्टय पुन्हा पुन्हा सांगण्याचा खटाटोप तल्हारांना सहज आवरतां आला असता.

रफीकला वक्षिस मिळतें आणि कादंबरी आपला कड पालटून जीवनाच्या थोडयाफार जवळ येऊं लागते. एकमेकांच्या जगण्याला आधार असलेल्या (तें फार मित्र असतात!) शंकर आणि रफीक ह्या जोडगोळींत त्यांना न जुमानतां एक अपरिहार्य पोकळी निर्माण होते. ह्या पोकळीची तीव्र जाणीव मग तल्हार रंगवूं लागतात. आणि शंकर 'आपल्याला कुणी पहात नाहीं तर' ह्याचा अदमास घेत पोस्ट ऑफिसांत घुसतो तेव्हां ही जाणीव अधिकच पोरकी होते. अगदी उघडयावर पडते.

पुढेंहि तल्हार तेवढयाच नाजुकपणें आणि सहजपणें ही पोकळी हाताळतात, मात्र शंकर व त्याची पत्नी ह्यांना थिएटरमध्यें 'बामणी' बोलींत बोलविण्याचा त्यांचा प्रयत्न कलेच्या संदर्भात सपशेल फसतो.

मध्येंच तल्हारांनीं कादंबरींत दोन पत्रें घातलीं आहेत. एक शंकरच्या सासऱ्याचें व दुसरें मालवणांतल्या 'नातवाचें'. पत्रांची आवश्यकता होतीच कां हा भाग वगळला तरी वऱ्हाडी माणसाचा मोठेपणा—सहृदयता-मालवणच्या माणसाकडून गौरविणें मुळीच आवश्यक नव्हतें. शंकर, त्याची बायको व शेजारी आपुलकीनं आजीचं अडलं-नडलं पाहतात ह्यांतच सारं येतं. तरीहि तल्हार पत्रं टाकतात. कादंबरीची रसहानि—नैसर्गिकता मग ह्या व अशासारख्या कितीतरी प्रसंगांनीं पार निघून जाते.

अपघातांत शंकरचे पायच निकामी होतात आणि मग कादंबरी करुण होऊं लागते. सुरुवातीलाच येऊन गेलेला रस्त्यावरचा घुसणारा शंकर आतां घुसत घुसत रस्त्यानें जात असतां लेखकानें सांधलेला मागच्या प्रसंगाचा दुवा तो सारा प्रसंग जीवंत करून सोडतो. वाचकाला अस्वस्थ करून सोडतो. (सारें असेंच झालें असतें तर?......)

पाय कामांतून गेल्यानं सारं बळच संपलेला मागचा बेफाट (लेखकाचं म्हणणं) शंकर आतां घरांतच पडून असतो. रफीकहि येवढयांत आलेला नसतो. घरांतलं धान्य संपून गेलेलं असतं. कांहीं कामधंदा करायलाच हवा म्हणून भांडीं घांसायला गेलेली शंकरची बायको घरीं येते. मालकानं तिच्याशीं अतिप्रसंग करण्याचा प्रयत्न केल्याचं त्याला सांगते. व आपण आतां कांहींच करूं शकत नाहीं-आपल्या बायकोचं रक्षणहि करूं शकत नाहीं ह्या अगतिकतेच्या जाणिवेंत कादंबरी संपते.

—खरं म्हणजे आतां आतां कोठें वाचकाला वाटायला लागत असतें कीं पुढें कांहींतरी खासच चांगलें आहे. पण...!

**—वामन प्रभू**

(**'माणूस'** : कादंबरी लेखक : श्री. मनोहर तल्हार मूल्य : रु. १० प्रकाशक : मॅजेस्टिक बुकस्टॉल मुंबई) ●●●



अनुक्रमणिका

## ऐसा गा मी ब्रह्म !

कुणा संतानें कवींकळीं आत्मसाक्षात्काराचं आध्यात्मिक आत्मकथन करतांना आवेगांत म्हणून टाकलं, 'ऐसा गा मी ब्रह्म'..! ती तत्क्षणींची प्रेरणा व धारणा पण निराळी होती. गूढ, गडद, गहिरी, गहन अशी ! तोच घोष घेऊन आज एका नव्या प्रेरणेनें व नव्या धारणेनें नारायण सुर्वे महाराष्ट्रापुढें आलेले आहेत. ते जेव्हां उद्गारतात,

**ऐसा गा मी ब्रह्म । विश्वाचा आधार**
**खोलीस लाचार । हक्काचिया ॥**

तेव्हां ब्रह्म विचारें वापुडवाणें होऊन खोलींत दडून बसतें. आणि खोली मात्र ब्रह्माएवढी होतें. असा हा ब्रह्माचा साक्षात्कार सुर्व्यांना आधुनिक काळांत घडतो. गेल्या दोनचार दशकांतला मराठी काव्याचा इतिहास नव्या दमाच्या तरुण कवींनीं घडविलेला. कविवर्य कुसुमाग्रजांनीं चेतविलेला हा कवितेचा स्फुल्लिंग इतर मध्यमवर्गीय कवींनीं कधीं फुंकर घालून फुलविला; कधीं अलीकडे ही फुंकर घालायलाच ते विसरले, इतके ते बाजूला पण सरले. कुणी लावणी रंगांत दंगले; कुणी वात्रटपणा करूं लागले. कुणी इष्काच्या मस्तींत मशगुल झाले आणि इतर अनेक अत्याधुनिकतेच्या आश्रयाला जाऊन मूळ प्रकृति गमावून विकृतींत लडबडूं लागले; नंग अंगें चिवडूं लागले आणि लिंग प्रदर्शन करूं लागले. अशा समयीं नारायण सुर्वे सारखा एक कामगार कवि मराठी कवितेची लाज झाकण्यासाठीं आपल्या मराठमोळ्या शब्दांची व रसरसत्या पुष्ट भावभावनांची गोडवी घेऊन पुढे सरसावला ही किती उत्साहदायक व आनंदी घटना आहे. प्रारंभींच आंतले 'चार शब्द' बोलतांना सुर्वे सहज स्वच्छ मोकळेपणानें सांगून टाकतात. . .

**कामगार आहे मी तळपती तलवार आहे**
**सारस्वतांनो ! थोडासा गुन्हा करणार आहे**

आणि पुढें ते इशारा पण देतात.

**एकटाच आलों नाहीं युगाचीहि साथ आहे**
**सावध असा तुफ़ानाची हीच सुरवात आहे**

सरस्वतीच्या दरबारांत अशा रीतीनें आपण कुणी गुन्हेगार आहोंत अशा न्यून भावनेनें नारायण सुर्वे प्रवेश करतात; पण त्यांनीं केलेला गुन्हा हा खरा गुन्हाच नव्हे असा निवाडा 'सारस्वतां'च्या मुखावाटें सरस्वती देऊन जाते. सुर्व्यांचा पिंड कामगाराचा आहे. कामगारांच्या लढ्याचें रणशिंग जें शतकापूर्वी फुंकिलें गेलें आहे, त्या लढ्याशीं प्राणपणानें एकजीव झालेला असा हा पांढरपेशा नसलेला व बराचसा अनपढ, वर्गवेगळा अन् तरीहि वर्गीय कवि आहे; त्याला वर्गलढ्याचा सिद्धांत ठामपणें कळलेला आहे आणि क्रांतिदेवतेच्या मंदिरांत तो सरस्वतीची उपासना करण्यासाठीं बद्धपरिकर होऊन सारस्वतांची जवळीक दचकत बिचकत पण निर्धारानें व निष्ठेनें साधूं इच्छित आहे. शिष्टसंप्रदायाला कांहींसे तडे त्यामुळें जातील याची त्याला जाणीव आहे; पण अशिष्टतेच्या आहारीं न जाण्याइतका तो नम्र व जागृत आहे.

सुर्व्यांनीं लिहिलेली त्यांची कविता तशी विपुल नाहीं. काळजांत ठणका आला, शब्द त्यांना ढकलीत राहिले, तसे ते लिहीत राहिले. मात्र त्यांना येणारा हा ठणका ठिणगी पेटवीत व आग ओकीत येतो. मग त्यांना शब्दांची वाण पडत नाहीं; आणि त्यांतील आशयाला अपुरेपणा मानवत नाहीं. पुऱ्या अर्थाचें पुरें बोलणें पुरेपूर बोलून व महापुरांत उसळणाऱ्या भोवऱ्यांसारखें आवर्तन घालून त्यांची कविता भावनर्तन करते. व नंतर थबकते. थरकते. सुर्व्यांचा पिंड युगायुगांत घामेजून निथळलेल्या कामगाराचा असला तरी त्यांच्यांतील कलावंत युगायुगांतील कलेचीं मूल्यें जोपासीत व जपत आपल्या कलेचा मनोज्ञ आविष्कार करतो; आणि तेव्हां ते अभिजात कवींच्या पंक्तीला अलगद जाऊन बसतात. त्यांची दुनिया प्रस्थापित मराठी कवींच्या दुनियेहून वेगळी आहे. त्या दुनियेचें वर्णन सुर्वे करतात . तें असं असतं.....

**बगलेंत धुरांडे दाबून**
**राजमुद्रा त्यावर ठोकून**
**रणपंडित लढतों आम्ही**
**बलवानच ठरतों आम्ही**

ते 'गिरणीची' लावणी गातात व विचारतात,

**'निर्मून धन आम्ही सारं ।**
**मालक असून आलों चोर ।**
**पैका नाहीं इंधनाला ।**
**काय शोजवावं बोला ! ..**

'विराट श्रम सूर्याच्या कक्षेंत, स्वतःस उजळीत' इतरांना 'मुग्ध' करण्याची हिंमत सुर्व्यांची कविता डौलानें धरते. प्रस्तावनेंत कुसुमाग्रजांनीं म्हटल्याप्रमाणें त्यांची कविता 'लढाऊ वृत्तीची, समाजक्रांतीची उपासना करणारी, नव्या आनंदवनभुवनाचें मनोहर स्वप्न पाहणारी आहे'...पण हें सारें साधीत असतां सुर्व्यांचें कलावंत मन कामगारांच्या आग्रही व आकस्ताळी प्रचारी प्रक्षुब्धतेला संयमाचा हळुवार लगाम लावतें. व कलेची हानि होऊं न देतां आपलें इप्सित साधतें. अशा वेळीं त्यांच्या अभिव्यक्तीला तळपत्या तलवारीची दीप्ति व धार दोन्हीं प्राप्त होतात. आपल्याला हव्या त्या प्रतिमा कारखान्यांतून आणि शेतखातांतून ते बेदिक्कत उचलून घेतात व वापरतात. तेव्हां बरें वाटतें कीं अजून त्यांच्यावर पांढरपेशा संप्रदायी कवितेचे संस्कार झालेले नाहींत; 'मराठा'त त्यांची 'भारतीय जवानाचें पत्र' ही अष्टपदी व तीन कडवी कविता प्रसिद्ध झाली तेव्हांच त्या कवितेंतील हळुवार भावाभिव्यक्तीनें रसिकांचीं मनें सुर्व्यांनीं आपल्याकडे खेंचून घेतलीं होतीं. प्रत्येक कडव्याच्या शेवटच्या नवव्या ओळीवर कवीने जी काव्यविषयाला कलाटणी दिली आहे, ती हृदयाचा ठाव घेते. चिनी आक्रमणाच्या पार्श्वभूमीवर मराठींत निर्माण झालेल्या सर्व कवितांमध्यें नारायण सुर्व्यांच्या या कवितेला तोड नाहीं. इतकी ही कविता अजोड व अमर आहे. तळपत्या तलवारीचीं व रोखलेल्या संगिनींचीं गीतें गाणारी सुर्व्यांची कविता कांहीं घरगुती भावभावनांचीं नाजुक आंदोलनें शब्दांत अचूक पकडते तेव्हां ती मोरपिसाइतकी तरळ व संवेदनक्षम होऊन करुण कोमल होते. 'गलबलून जातो तेव्हा', 'माझी आई', 'सुनें आभाळ', 'दोन दिवस', 'येतेस दमून' सारख्या त्यांच्या कविता मनाला विलक्षण अस्वस्थ करतात व निरोगी निर्मळ प्रीतिभावनेची व साध्याभोळ्या समृद्ध वेदनेची एक वेगळीच अनुभूति देऊन जातात. उपरोधाचें शस्त्र पण तितकेंच प्रभावीपणें या कवितांतून परजलें जातें. 'शब्दांचे ईश्वर' ही कविता सुर्व्यांच्या दाहक व समर्थ लेखणीचें तेजाब पिऊनच जन्माला आली आहे.

'काव्य करायाचें जिथ्या जीवाचें जातिवंत करणेंच हवें' ही कै. गोविंदाग्रजांनीं सांगितलेली कसोटी सुर्वे सर्वार्थानें पार पाडतात व म्हणूनच आपलें असें स्वतःचें स्थान ते मराठी काव्यांत निर्माण करतात. त्यांची कविता विश्वजागृत आहे. तिला भारतीय शहीदांचा जसा विसर पडलेला नाहीं; तसाच कांगोंतील भारतीय जवानांचा व लुमुम्बाचा विसर पडलेला नाहीं. बावीस फेब्रुवारीची आग अजून त्यांच्या उरांत धगधगते आहे; कधीं त्यांच्या शब्दांवर 'तुझ्या' पापण्यांचा पहारा असतो, तर






कधीं शब्द त्यांच्याकडे पाहुणे होऊन येतात व मग आपला पाहुणचार संपल्यावर त्यांना पोंचवून सुर्वे घरीं येतात व 'स्वतःलाच हरवून' उदास होतात व 'त्यांचें मन ढोर होतें...' सुर्व्यांची अस्सल कविता आहे तिला कुणाची नक्कल नकळत सुद्धां खपत नाहीं; तिचा पिंड अस्सल मराठी मातीचा व निरोगी मनाचा व बंडखोराचा आहे. परंतु जिथें अगदींच प्रचारकी मोहाला ते शरण जातात तिथें त्यांच्यांतला कलावंत त्यांच्यांतील कामगाराला शरण जातो व मग काव्यनिर्मितीला खीळ पडते व गाणीं रचलीं जातात. शब्द 'ठणक्या' मागून येण्याऐवजी 'शब्दां'चा 'ठणका' धरून अर्थाला दाव्यानें बांधलें जातें व कवि सुर्वे शाहीर सुर्वे बनतात : परंतु असे अपघात सुदैवानें सतत घडत नाहीत. म्हणूनच मराठींतील उद्याच्या या 'मायकोव्हस्की'कडे उदंड आशेनें पहावेसें वाटतें. त्यांना कुसुमाग्रजांसारख्या महाकवीचे आशीर्वाद लाभावेत हें केवढें त्यांचें भाग्य.....!

**(ऐसा गा मी ब्रह्म—लेखक : नारायण सुर्वे** प्रकाशक : अभिनव प्रकाशन, मुंबई १२. मूल्य रु. २–५०)

**—प्र. श्री. नेरूरकर**

---

(पान १० वरून)

दिल्लीचा बांवता रहिवास संपवून भल्या सकाळीं आम्ही विमानतळावर उपस्थित झालों 'जनपथ'चा निरोप घेतला. आतां दुपारचें. भोजन श्रीनगरांत असे मनोरथ रचूं लागलों. तोंच आम्हांला सांगण्यांत आलें कीं "ह्या विमानांत तुमच्यासाठीं जागाच राखलेली नाहीं. तुम्हीं या विमानानें निघूं शकत नाहीं."

हें ब्रह्मवाक्य ऐकून आहीं सर्द झालों. "आ" वासून विमानाकडे पहात राहिलों. पण त्या नुसत्या पहाण्याचा कांहींच उपयोग नव्हता. कसली तरी तांत्रिक चूक झाली होती. कसली, तें वायुविद्यानिपुण देशपांड्यांनीं मला समजावून सांगितलें. आमचें सामान परत आणलें गेलें व हात हलवीत आम्हीं गेलों तसेच परत निघालों. 'आतां परत चूक नको' म्हणून प्रथम आम्ही 'इण्डियन एअरलाइन्स'चें कार्यालय गांठलें. माडगूळकर व मी तर स्वस्थ एका बाकड्यावर बसून राहिलों. देशपांडे, सवनीस व केळकर मात्र धांवपळ करीत होते. देशपांड्यांचा एक पूर्वपरिचित त्यांना सहाय्य करीत होता. हा एक गणवेषधारी दाक्षिणात्य वायुवीर होता. पुन्हा चूक होणें नको, म्हणून हीं सारीं माणसें खटाटोप करीत होतीं. माडगूळकर बसल्या-बसल्या तत्वज्ञ वृत्तीनें पान लावीत होते व मी विचार करीत होतों.

"आभाळांत विमान चुकत कसें नाहीं ?" या अतृप्त शंकेभोवतीं माझें मन घोटाळत होतें. 'विमान असें चुकलें तर तसें का चुकत नाहीं ?' माझें मन मला प्रश्न विचारीत होतें. आभाळांत तर कसलीच खूण नसते. भूगभाटांतला मनुष्य मलबारहिलवर चुकला तर त्याला आपली चूक समजूं शकते. भुईवर अनेक खाणाखुणा असतात, घरें असतात, झाडें असतात, नांवाच्या पाट्या असतात. आभाळांत तर ह्यापैकीं कांहीं एक नसतें. नुसता पोकळ पसारा ! 'ऑपेरा हाऊस'ला खूण आहे. 'अपोलो बंदरला' खूण आहे. पण आभाळांत कशाची खूण ? इथलें आभाळ आणि तिथलें आभाळ सारें सारखेंच ! नुसतें निळें मैदान ! कुठें आखलेली वाट म्हणून नाहीं. कीं एकहि पाटी नाहीं. मग हीं विमानें चुकत कशीं नाहीत? शेंकडों मैलांचा प्रवास करून एखाद्या कबूतरानें ठरीव छपरावर उतरावें, तसें विमानतळ नामक एका उपेक्षणीय ठिपक्यावर हीं उतरतात कशीं ? असेच अनुत्तरित प्रश्न माझें मन मला विचारीत होतें. तोंच माझी प्रश्नमाला तोडून माडगूळकर मला म्हणाले,

"बुवा, कुठें आहांत ?"

"मसणांत !" मी उत्तरलों.

"तर मग आतां सेंट्रल कोर्ट हॉटेलांत चला ! तिथं आपल्याला जायचं आहे."

"कां ?" मी चिडखोरपणें विचारलें.

"'जनपथ' मधली आपली जागा गेली." माडगूळकर मला सांगूं लागले, "उद्यां विमानांत आपल्यासाठीं जागा नाहीं. परवां आहे म्हणतात. तोंवर सेंट्रल कोर्ट मध्यें केळकरांनीं आपली व्यवस्था केली आहे. उठा. चला तिकडे !"

आणि मग आम्हीं 'सेंट्रल कोर्ट' नामक एका निवासस्थानीं येऊन पोहोंचलों. एखाद्यानें आपल्या ऐतिहासिक वाड्याचें हॉटेल करावें, तसा ह्या हॉटेलचा थाट होता. हॉटेल 'कॉनॉट प्लेस' मधेंच होतें. पण एखाद्या मोंगली अंतःपुरांत वाटावें तसें इथल्या खोल्यांत आम्हांला वाटलें.

पण हा अधिक मिळालेला वेळ वसंतराव कानेटकरांच्या पथ्यावर पडला. त्यांनीं लाल किल्ला, राजघाट आदि दिल्लींतलीं स्थळें ह्या अवकाशांत पाहून घेतलीं. मी त्यांना सोबत केली. उरलेला वेळ गप्पा-गोष्टी, भेटीगाठींत कसा संपला तें कळलेंहि नाहीं. माडगूळकर आणि देशपांडे ह्यांच्यासारखीं बैठकी रंगविणारीं दोन माणसें बरोबर असतांना वेळ संपण्याचा प्रश्नच नव्हता. तशांत 'महाराष्ट्र टाईम्स'चे श्री. गोविंदराव तळवलकर उत्तरेंत फिरत होते तेहि बैठकीला हातभार लावून गेले.

आणि मग पुन्हां एके प्रातःकाळीं आम्हीं 'सफदरजंग' विमानतळावर उपस्थित झालों.

**(क्रमशः)**

•••

**दीपावली बुद्धि बळ क्र. ६ च्या विजेत्यांची यादी**

१) श्री. अरविंद गो. दंडवते, बडोदे.
२) कुमार हरिहर कामत, बोरिवली.
३) सुधा केळकर, हिंगणें.
४) सौ. शान्ताबाई देशमुख, पुणें
५) उमेश मुकुंद श्रीखंडे, मुंबई



अनुक्रमणिका

**दीपमाला**

# 'गडकऱ्यानंतर मनाचें समाधान करणारे नाटककार भावे तुम्हीच'

**—चिंतामणराव कोल्हटकर**

'मे महिन्याच्या एक तारखेपासून अहमदनगर येथें भरणाऱ्या ४६ व्या नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष म्हणून पुरुषोत्तम भास्कर भावे यांची निवड झाली आहे' हें वृत्त प्रसिद्ध झाल्यावर महाराष्ट्रांत सर्वत्र समाधानाचा सूर उमटावा यांतच भाव्यांचा मोठेपणा व नाट्यसंमेलनाचा गौरव आपोआपच साधला गेला आहे असें आनंदानें म्हणतां येईल. भाव्यांची ही निवड करतांना निवड करणारांनी भाव्यांची गेल्या दोन अडीच तपांतील साहित्य सेवा निश्चितच ध्यानांत घेतलेली आहे यांत संशय नाहीं. खरें म्हणजे महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदीं विराजमान होण्याइतकी प्रदीर्घ, साहित्य साधना भाव्यांनीं उग्र एकनिष्ठेने आजवर अविरत केली आहे. कदाचित् त्या मानाचे वारसदार होण्यापूर्वीची शुभसूचक नांदी म्हणूनच तर नाही ना नाट्यरसिकांनीं त्यांची नाट्यसंमेलन पदीं यंदा एकमुखीं निवड केली असावी ?

भाव्यांची नाट्यसाधना देखील वीस वर्षांइतकी जुनी. त्यांचें पहिलें नाटक 'विषकन्या' त्यांनी १९४४ सालीं लिहिलें. 'गडकऱ्यानंतर माझ्या मनाचें समाधान होईल असें नाटक लिहिणारे भावे तुम्हीच' असें उद्गार त्यावेळीं चिंतामणराव कोल्हटकरांनी साश्रुनयनांनी काढल्याचें भाव्यांच्या निकटवर्तीयांना चांगलें ठाऊक आहे. 'विषकन्ये'तील निळकंठाची व्यक्तिरेखा भाव्यांनी खास चिंतामणरावांसाठीं लिहिली होती. परंतु ज्यांच्यासाठीं तें नाटक लिहिलें गेलें त्यांच्याकडून तें नाटक प्रत्यक्ष रंगभूमीवर येऊं नये असाच योगायोग असावा ! प्रायोगिक दृष्ट्या 'विषकन्ये'च्या पदरीं अपयश पडलें ही वस्तुस्थिती असली तरी एक भाषाशैलीचा प्रमत्त आविष्कार दाखविणारी व आपल्या वाङ्मयीन रसरंगाने ढंगदार बनलेली अव्वल दर्जाची नाट्यकृति म्हणूनच 'विषकन्ये'चें स्वागत झालें होतें. आजही 'विषकन्ये'चें वाङ्मयीन सौंदर्य व भाव्यांच्या जोमीली भाषाशैलीची प्रदीप्ति यत्किंचितही ओसरलेली नाही. भाव्यांचें दुसरें नाटक 'स्वामिनी' १९५६ सालीं ललित-



कलादर्श मंडळीने रंगभूमीवर आणलें व तें नाटक रंगलें व गाजलें. 'दीपावली'च्या दिवाळी अंकांत गाजलेली भाव्यांची प्रदीर्घ कथा 'मादाम पिशी' यावर हें नाटक भाव्यांनी नेटकें व अचूक बेतलें व साधलें. विजया काशी या भाव्यांच्या दोन टोकांच्या दोन वेगवेगळ्या मानसकन्या. आधुनिक हिंदु स्त्रीकडे पाहाण्याचा भाव्यांचा दृष्टिकोन या दोन स्त्रीपात्र निर्मितींत बराचसा बोलक्या बेधडकपणें प्रकट झाला आहे. असें आवर्जून, आक्रस्ताळेपणाने व आकांतानें म्हटलें गेलें. भाव्यांना टीकेच्या धारेवर धरण्यांत आलें; व पण नाट्यवेड्या मराठी रसिकांनी भाव्यांच्या 'स्वामिनी'चें विलक्षण कोडकौतुक केलें.

भाव्यांचें तिसरें नाटक 'पडछाया' मात्र पहिल्या नाटकाप्रमाणेंच पडलें. पण बर्नार्ड शॉच्या नाटकांप्रमाणेंच भाव्यांचीं नाटकें स्वमत प्रतिपादनार्थच बहुशः लिहिलीं गेलीत हें वाङ्मयीन सत्य आहे व वाङ्मयीन मूल्यांच्या निकषावरच भाव्यांच्या नाट्यकृतींना मराठी साहित्यांत वेगळें असें स्थान प्राप्त झालें आहे. भाव्यांनी चित्रपटकथा लिहिल्या, त्यांचे संवाद लिहिले व तीही एक नाट्यसेवाच केली. भाव्यांचें नाट्यलेखन आज थांबलें आहे असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. अजूनही खूप व मौलिक लेखन करण्याची त्यांना उमेद आहे. भाव्यांना लेखनाचें काय किंवा नाटकाचें काय अभिजात वेड आहे; पण नितकाच नाटकीपणाचा व नटवेगिरीचा मनस्वी तिटकारा आहे. भाव्यांना ढोंगीपणाची चीड आहे व सोंग घेण्याचें त्यांना जीवनांत कधींच रुचलें नाहीं नावलें पण नाही. म्हणून त्यांनी आपल्या मतांना व प्रच्छन्न व्यक्तिगत व व्यक्तिनिरपेक्ष तत्त्वज्ञानाला मुरड घालून तडजोड स्वीकारली नाही. भाव्यांच्या ह्या पारदर्शक प्रामाणिकपणाची प्रचीति त्यांच्या विरोधकांना पण नेहमीच आलेली आहे. म्हणूनच त्यांच्याशीं सहमत न होणारे सुद्धां भावेंच्या एकूण व्यक्तिमत्त्वाशी समरस होतात व अंतीं भाव्यांना मानतात व मानवतात. भाव्यांच्या विचार—दर्शनांत केवळ आवेश असतो असें नाही; आवेग पण असतो. भावे भावनेला मुरड घालून केवळ अभावात्मक असा 'न-भावे' विचार करूंच शकत नाहींत.

आणि शेवटीं नाट्य म्हणजे तरी काय असतें ? भावोर्मि, भावोद्रेक व भावाविष्कार या भावसूत्रांवरच नाटकाचा आत्मा स्फुरतो व फुलतो. भावेंनी मराठी नाटकाचा व रंगभूमीचा परिचय केवळ पुस्तकी पढीकपणाने करून घेतलेला नाही. आत्यंतिक संवेदनाक्षमतेने त्यांनी मराठी नाटकें पाहिलीं आहेत. लिहिली आहेत, परीक्षिलीं आहेत व पचविलीं आहेत. जुन्याचा रास्त अभिमान असणाऱ्या भाव्यांना नव्याची रास्त चीडही असेल व चाड पण ! पाश्चात्य रंगभूमीवरील नवनवे प्रयोग व नवनवे नाटककार यांची सूक्ष्म व स्पष्ट पहचान भावेंना आहे. त्यांचा आंधळा उदोउदो करायला भावे केव्हांही तयार होणार नाहींत व त्यांची केवळ मराठी जीवनाशीं अवास्तव व अप्रस्तुत री ओढणाऱ्यांची भावे गय पण करणार नाहींत. भाव्यांना वक्रोक्तीचें वांकडे नाहीं; पण जेव्हां भावे स्पष्ट व सरळ बोलतात तेव्हां त्यांच्या वाच्यार्थाला त्यांच्या









अनुक्रमणिका

वक्रोक्तीच्या अनंतपट धार येते व आधाराशिवाय बोलण्याची वा लिहिण्याची त्यांच्या जिभेला व लेखणीला संवय नाही.

आजवर मराठी नाटयसृष्टींत बरेंच कांहीं घडलें, बिघडलें व अवघडलें पण आहे. कुणी-तरी ठामपणें व निक्षून जें स्वतःला सद्यकालीन नाटयस्थितीबद्दल वाटतें तें तसेंच बोलण्याची वेळ आमच्या इतकी पूर्वी कधींच आली नव्हती. महाराष्ट्रांतील नाटयप्रेमी रसिकांनी यंदा नगर येथें भरणाऱ्या मराठी नाटयसंमेलनाच्या अध्यक्षपदीं पु. मा. भावे यांची नियुक्ति करून मोठें औचित्य दाखविलें आहे. पत्राशीच्या बाजूला झुकलेल्या व साहित्य साधनेची पंचविशी गांठलेल्या भाव्यांचा नाटकावरचा अधिकार म्हणूनच मोठा आहे. भावे प्रांजलपणें व निर्भीडपणें काय बोलतात याकडे अखिल मराठी नाटयभक्तांप्रमाणेंच 'दीपावली'चे लक्ष खिळून राहिलें आहे. 'दीपावली'चे व भाव्यांचे संबंध 'दीपावली'च्या स्थापनेपासून तो आजतागायत निकट स्नेहाचे, अतूट जिव्हाळयाचे व निर्मितीक्षम सहकार्याचे राहिले आहेत. भाव्यांचें म्हणूनच सहर्ष हार्दिक अभिनंदन करीत असतां 'दीपावली'ला साभिमान धन्यता पण वाटत आहे. ☆

# साहित्याचा सरकारी पारितोषिक-उत्सव

दरवर्षी होणारा नव्या मराठी पुस्तकांना पारितोषिकें देण्याचा कार्यक्रम महाराष्ट्र राज्यांत नुक्ताच पार पडला. गेले एक दोन महिने मुंबईतील साहित्यिकांच्या वर्तुळांत पारितोषिकांबद्दल उडणाऱ्या नानाविध व मनोरंजक वावडया आतां बंद पडल्या आहेत. एकदाचा काय लागायचा किंवा लावायचा तो अंतिम निर्णय महाराष्ट्र राज्य सरकारच्या पारितोषिक समितीनें जाहीर केला आहे आणि सारें कांहीं ठीक झालें आहे ! आतां एक वर्षासाठीं सोय झाली आहे आणि पावसाळा संपून व दीपावलीचा उत्साह ओसरेपर्यंत पुढील वर्षीच्या पारितोषिकांबद्दल नवे जुने साहित्यिक स्पर्धक गाफील राहतील; नंतर अंदाज घेतील; नंतर ठराविक मुदतीच्या आंत आपापलीं पुस्तकें सरकारदरबारीं रुजू करतील; आणि पुनः वावडया उडूं लागतील; आंतील गोटांतून आलेल्या विश्वसनीय वार्ता म्हणून कांहीं पुस्तकांचा व प्रकाशकांचा (त्यांनीच घडवून आणलेला) बोलबाला होत राहील व अंतीं सर्वच प्रकरणाचा कांहीं वेगळाच, प्रसंगीं अतर्क्य व बहुधा अगम्य असा निकाल लागेल. असें हें वर्षानुवर्ष होत राहील; आणि सारस्वतांना आपण सक्रिय प्रोत्साहन देत आहोंत या अभिनिवेशांत सरकारी यंत्रणा वर्षअखेर आपल्या तिजोरींतील खर्ची पडलेल्या रकमांचा हिशेब दप्तरीं दाखल करीत राहील—पण हें असेंच आंधळेपणानें वर्षानुवर्ष चालत रहावयाचें काय ?

या पारितोषिक पद्धतीवर यंदा महाराष्ट्रांत जी पखड टीका कांहीं वर्तुळांतून झाली व होत आहे तिची दखल महाराष्ट्र सरकारच्या सांस्कृतिक व शैक्षणिक खात्यानें घेतली पाहिजे. त्यांतले कांहीं आक्षेप पुढीलप्रमाणें :

(१) ही पारितोषिक समिती पुस्तकांबाबत अंतिम निर्णय, कोणत्या शास्त्रीय पद्धतीने घेते ?

(२) पुस्तकांना पहिले, दुसरे, तिसरे इत्यादि क्रमांक कसे दिले जातात ?

(३) प्रत्येक क्रमांकाला केवळ एकमेव अशी पारितोषिकाची रक्कम कां दिली जात नाहीं ?

(४) ती विभागण्यांत कां येते ? व कशी येते ?

(५) परीक्षा समितीवर परीक्षक म्हणून ज्यांची निवड होते त्यांची कसोटी कशी लावली जाते ?

(६) बक्षिसांस पात्र ठरलेल्या ग्रंथांखेरीज इतर ग्रंथांच्या बाबतींत जें कांही बरें वाईट घडलें असेल, तें त्या ग्रंथकारांसाठीं कां निवेदिलें जात नाही ? (म्हणजे त्यांना पुढील वेळीं गुणवृद्धि व दोषक्षय साधता येतील.)

(७) पुस्तकांचें वर्गीकरण कोणत्या वाङ्मयीन तत्त्वानुसार केलें जातें ? (उदा. ललित लेखन या विभागांत जें कांहीं समाविष्ट केलें जातें तें....कोणत्या आधारावर...! प्रवासवर्णन (Travelogue) व लघुनिबंध हा प्रकार वेगळा नाही काय ? ...वगैरे...)

(८) बालवाङ्मयाचें काय ?...चोपडीवजा एखाद्या पुस्तकाला केवळ तें कदाचित् आकर्षक रंगसंगतीसह छापलें जातें म्हणून अख्खें पहिलें पारितोषिक, दिलें जातें व मौलिक स्वरूपाच्या समीक्षात्मक व सौंदर्यात्मक ग्रंथाला बक्षिस मिळालेंच तर तें विभागण्यांत येतें याचा अर्थ काय ?

(९) तथाकथित बालवाङ्मयाबाबतींत तर दरवर्षी तींच तींच नांवें हटकून (एकाद्या मक्तेशहाप्रमाणे) पहिली बक्षिसें उपटतात हें कसें ? नव्याना उत्तेजन मग कोणतें दिलें जातें ?

(१०) कांहीं प्रथितयश व ज्येष्ठ साहित्यिक सुद्धां 'आपण बालवाङ्मयाच्या स्पर्धेसाठींच पुस्तकें लिहिलीं असती तर बरें झालें असतें' असें वैतागानें म्हणतात हें, कशाचें द्योतक ?

(११) परीक्षा-समितीचा उद्देश कांहीं अडल्या पडल्या मराठी साहीत्यिकांना आर्थिक मदतीचा हात देण्याचाच केवळ आहे काय ?

(१२) पारितोषिकांची परंपरा चालू ठेवूनहि आहे त्या पद्धतींत व शिरस्त्यांत इष्ट व अधिक प्रगत असा बदल करतां येणार नाहीं काय ?

ही प्रश्नमाला देण्याचा हेतु उघडच आहे.

पारितोपिक समितीचा अखेरचा निर्णय हा सर्वसामान्यतः शिष्टांच्या, सुज्ञ समीक्षकांच्या व रसिक वाचकांच्या मान्यतेला पण पात्र व्हावयास हवा. तसें महाराष्ट्रांत गेल्या दोन तीन वर्षांत झालें आहे असें म्हणतां येत नाही. गेल्या वर्षीचें 'रथचक्र' प्रकरण अजून ताजेंच आहे. 'रथचक्र' ही मराठींतील एका समर्थ कादंबरीकाराची समर्थ कादंबरी. पण तिला गेल्या वर्षी पहिलेंच काय पण कोणतें दुसरें पारितोषिक पण देण्यांत आलें नाहीं. अंतीं यंदा ललित अकादमीने ती मराठीतील सर्वोच्च कलाकृति ठरवून तिला अखिल भारतीय कीर्तीचें पारितोषिक व बहुमान दिला. महाराष्ट्र राज्यांतील ग्रंथ परीक्षा समितीनें हें पुस्तक गेल्या वर्षी कां निवडलें नाही ? तर म्हणे त्यांतील अश्लिलता त्यांच्या कसोटीच्या आड आली. पण यंदा जयवंतराव दळवींची 'चक्र' ही कादंबरी प्रथम पारितोषिकाचा (तें विभाग-









ळलें ही गोष्ट सोडून द्या !) मान पटकावून• वसली. तिच्यांतील अश्लिलतेचा पण वराच वोलवाला झाला होता. मग गेल्या वर्षी एक दंडक व यंदा दुसराच हें कसें काय ? 'रथचक्र' काय किंवा 'चक्र काय, दोन्ही श्रेष्ठ कलाकृति आहेत. खरें म्हणजे यंदाचें कादंवरीचें पहिलें पारितोषिक अखंड असें 'चक्र' ला मिळणें योग्य होतें; तेवढी त्या कादंवरीची एक वेगळी योग्यता सिद्ध झालेली आहे. पण तिच्या वरोवरीने पहिल्या मानाची ठरलेली कलाकृति खरेंच पहिल्या मानाची ठरते काय ?

तीच गोष्ट काव्य ग्रंथांची. कवि ना. घ. देशपांडे यांच्या 'अभिसार' या कवितासंग्रहालाच पहिलें पारितोपिक न विभागतां कां देण्यांत आलें नाहीं ? त्या पुस्तकाच्या पंक्तीला 'दिवेलागण' हा संग्रह ओढून ताणून कां वसविण्यांत आला ? 'दिवेलागण' या संग्रहांतील काव्याचा वोध स्वतःला होत नाही म्हणून मराठींतील एका प्रथमश्रेणींतील समीक्षकाने तें पुस्तक समीक्षेसाठीं नाकारलें होतें. उलट दुसऱ्या वक्षिसांच्या विभागलेल्या पंक्तीला वसलेला 'ऐसा गा मी ब्रह्म' हा काव्यसंग्रह वैशिष्टयपूर्ण व त्यांतील निरोगी, पुष्ट व निर्मळ भावविकाराच्या व आशयाच्या दृष्टीने उजवा नव्हता काय ? पण तो कवि व त्याचा काव्यसंग्रह मानपानांत शेवटच्या श्रेणींत टाकला जातो, हें कसें ?

यंदा जिचा वोलवाला झाला (व तो अगदीच अयथार्थ होता असें कुणीहि जाणता रसिक म्हणूं धजणार नाही) त्या 'कोसला' कादंवरीला (कटाक्षाने ?) वगळण्यांत आलें. भालचंद्र नेमाडे या तरुण व नव्या दमाच्या लेखकाने 'कोसला' ही कादंवरी लिहून मराठींतील कादंवरीच्या साचेबंदपणाला धडक दिली आहे व कादंवरी कोणतें नवें वळण आशय व अभिव्यक्तीच्या नावीन्यांतून व वास्तवतेंतून घेऊं शकते हें अपूर्वतेनें दाखविलें आहे. प्रारंभीं वराच काळ ज्या वावड्या उठल्या त्यांत 'कोसला' हीच कृति पहिल्या क्रमांकाला आली असल्याचें खरें खोटें वृत्त पसरलें होतें. मग ती कादंवरी अजीबातच गळली कशी व कां?

एकूण पारितोपिक समितीच्या निःपक्षपातीपणावद्दल व वस्तुनिष्ठ दृष्टिकोनावद्दल उपरिनिर्दिष्ट संशयाचें व संभ्रमाचें वातावरण निर्माण झालें आहे. ही वस्तुस्थिति आहे व तिच्याकडे महाराष्ट्र राज्याच्या अधिकृत प्रतिनिधींनी संपूर्ण व सत्यनिष्ठ लक्ष देण्याची वेळ आली आहे असेंच म्हटलें पाहिजे.

अलिकडेच एका मराठी दैनिकानें या पारितोपिकांवद्दल चर्चा करतांना एक उपयुक्त सूचना पण केली होती. दरवर्षीप्रमाणें पारितोपिकहि ठरलेल्या ग्रंथांना क्रमांक घालून त्यांच्या श्रेणी लावण्यापेक्षां, जर त्या त्या वर्षीची 'उत्तम किंवा उत्कृष्ट ग्रंथरचना' (Best Books of the Year) म्हणजे ग्रंथांची यादी प्रसिद्ध केली व त्या सर्वच ग्रंथांना (त्यांचे वेगवेगळे प्रकार जमेला धरूनही) सारखीच पारितोपिकाची रक्कम देण्यांत आली तर तें उचित होईल.

वाचकांनाही काय वाचावें व काय विकत ध्यावें हें त्यामुळें नीट समजतें व द्रव्यनिधीचा कांहींसा (लहरी) दुरुपयोग टळून सर्वांना सर्वांचें श्रेय जास्तींत जास्त प्रमाणांत दिल्याचें मानसिक समाधानही पारितोपिक समितीला मिळतें. पुष्कळशा पाश्चात्य देशांतहि पुस्तकांची वार्षिक निवड 'Years' Best' म्हणूनच करण्यांत येते, हेंही येथें नमूद करावेसें वाटतें.

**—सारस्वत**

---

## महाराष्ट्राच्या राजधानींत मराठी रंगभूमि 'स्वगृहीं' आली !

मुंबई मराठी साहित्यसंघाच्या संघमंदिराचा व डॉ. भालेराव नाट्यगृहाचा उद्‌घाटनसमारंभ गेल्या महिन्यांत संरक्षण मंत्री श्री यशवंतराव चव्हाण यांच्या हस्तें साजरा झाला. मुख्यमंत्री श्री. नाईक, गृहमंत्री श्री. वाळासाहेव देसाई. उद्योगमंत्री श्री. वर्वे, शिक्षणमंत्री श्री चौधरी, म. म. दत्तो वामन पोतदार, चित्रकार हळदणकर, शिल्पकार करमरकर इ. विविध क्षेत्रांतील माणसें व्यासपीठावर या निमित्तानें एकत्र आलीं होतीं. पंचेंद्रियांनीं ग्रहण केल्या जाणाऱ्या नाटक ह्या दृश्यकाव्याचें आकर्षण सर्वच थरांतील लोकांना असतें. दुसऱ्याच्या व्यक्तिमत्त्वाशीं तादात्म्य पावण्याची माणसाची ही ओढ फार जुनी आहे.

कै. डॉ. भालेरावांचें एक वऱ्याच दिवसांचें अपुरें राहिलेलें स्वप्न यामुळें साकार झालें आहे. त्यास अर्थातच संघाच्या सर्व कार्यकर्त्यांचे चिकाटीचे परिश्रम कारणीभूत आहेत. वाचक प्रेक्षकांची साहित्यविपयक समज वाढावी व विविध कलांच्या आस्वादानें त्यांचें व्यक्तिमत्त्व अधिक समृद्ध व संपन्न व्हावें म्हणून अनेक निरनिराळे उपक्रम त्यांनीं आतापर्यंत सादर केले आहेत व जनतेचा साहित्यस्नेह सतत जागता ठेवला आहे.

खास नाटकासाठीं असें हें सुसज्ज सभागृह वांधून महाराष्ट्राची राजधानी मुंबई ही सांस्कृतिक क्षेत्रांतहि पुनः आघाडीवरच राहिलेली आहे. तिचा कित्ता इतर शहरांनीहि आतां गिरवायला हवा. नाटकांत रस घेणारी मंडळी—केवळ प्रेक्षक या नात्यानेंच नव्हे तर निर्मितींतहि—गांवोगावीं आहेत. पण त्यांच्या कलाविपयक कुवतीस पुरेपूर वाव देणारें व नेपथ्य, प्रकाशयोजना, ध्वनिक्षेपण इ. सर्व अंगांनीं सहाय्यभूत होणारे नाट्यगृह क्वचितच आहे. परिणाम असा कीं वहुतेक नाटकें हीं एखाद्या सिनेमागृहांत वा शाळकरी रंगभूमीवर सादर करावी लागतात. आणि मग त्याच त्या अडचणींवर मात करण्यांतच वृथा शक्ति खर्च होते.

(स्तंभ २ पहा)

हें सर्व टाळण्यासाठीं व नाट्यक्षेत्रांत प्रयोगशीलता वाढीस लागावी म्हणून अशीं नाट्यगृहें गांवोगांव वांधलीं जावींत. म्हणजे नाट्यस्पर्धेसाठीं परगावाहून आलेल्या लोकांनाहि वुजल्यासारखें होणार नाहीं.

अर्थातच अशा वास्तु-उभारणीसाठी पैशाची गरज लागणारच. मुंबई महापालिकेने या निमित्तानें संघासाठीं जाहीर केलेल्या ५० हजार रु. च्या देणगीनें सत्पात्रीं दानाचा एक नवा पायंडा घालून दिला आहे असेंच म्हटलें पाहिजे. महाराष्ट्रानें केशवराव दाते तर नाट्यक्षेत्राला दिले आहेतच असे आणखीहि कांहीं 'दाते' मिळणें कठीण नाहीं ! ●●●








दीपावली बुद्धिवळ क्र. ७:



"दीपावली बुद्धिवळाचे" नियम व अटी मला मान्य आहेत.

स्पर्धकाचें नांव

पूर्ण पत्ता :

## दीपावली बुद्धिवळ क्र. ७

येथें कापा.

### आडवे शब्द

१ नवरा
३ कविता
५ कलिगड
८ अभिषिक्त राणी
१० पिंगट रंगाची गाय
१२ आकाशाची ढगाळ स्थिति
१५ तेजस्वी
१७ आदरसत्कार
१९ प्रामाणिकपणा
२० गाल बसलेला

### उभे शब्द

१ कंजूष
२ पाण्याचा तरंग
४ नखें काढण्याचें हत्यार
६ रहाण्याची पद्धति
७ देवाच्या नांवाची पुनः पुनः आवृत्ति
९ देऊळ
११ सनई
१३ भारतवर्ष
१४ उट्टें
१५ वासरूं
१६ लक्ष्मी
१८ बोटाच्या अग्रभागावरचें हाड

**उत्तरें पोहोचण्याची शेवटची तारीख**
**१५ मे १९६४**
**अधिकृत उत्तर–पुढील अंकांत**

### स्पर्धकांकरितां नियम व अटी——

१. ही स्पर्धा निःशुल्क आहे.

२. ह्या स्पर्धेत कोणालाहि भाग घेता येईल.

३. स्पर्धेकरितां पाठविण्यांत येणारीं उत्तरें ह्याच पानावर छापलेल्या **चौकोनी कुपनांत** भरलेलीं असावीत. कूपनावर नांव व पत्ता लिहिणें आवश्यक आहे. **अन्यथा तीं विचारांत घेतलीं जाणार नाहींत.**

४. उत्तरें **'दीपावली बुद्धिवळ,'** संपादक, **'दीपावली,'** दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई–४ या पत्त्यावर पाठवावींत.

५. ह्या स्पर्धेकरितां आलेल्या अचूक उत्तरांतून ती **लॉट पद्धतीनें काढून** ज्यांचें उत्तर आमच्या उत्तराशीं बिनचूक असेल, अशा **पहिल्या पांच भाग्यवान विजेत्यांना** दीपावलीचे **वार्षिक वर्गणीदार** करण्यांत येईल व त्यांना वर्षभर दीपावली भेट म्हणून पाठविण्यांत येईल.

६. एकावेळीं एकाच स्पर्धकास फक्त एकच चौकोन पाठविता येईल.

७. स्पर्धेबाबत संपादकांचा निर्णय अखेरचा मानला जाईल. त्याबाबत कसलाहि **पत्रव्यवहार केला जाणार नाहीं.**

८. उत्तरें पोहोचण्याची अंतिम तारीख १५ मे १९६४ ही आहे. नंतर येणाऱ्या उत्तरांचा विचार होणार नाहीं. उत्तर पुढील अंकांत प्रसिद्ध केलें जाईल.

### "बुद्धिवळ" क्र. ६ चें उत्तर—

**आडवे शब्द—**

२ सखा, ४ कलम, ६ जळू, ७ सहल, ९ हारा, १० गरवार, १२ सरोवर, १५ लीलावती, १८ कटकट, १९ गोप, २० रूपक, २१ तळ २२ तिरोप, २३ लीन,

**उभे शब्द—**

१ बजरंगबली, ३ खासदार, ४ कलहंस, ५ महादेव, ११ वारुव, १३ रोगट, १४ रहाट पाळणा, १६ लाखोपति, १७ तीर्थरूप, १८ कथकली,

**विजेत्यांचीं नांवें**
**पृष्ठ ५४ वर पहा**

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

# " गुणीदासां " चें अभीष्टचिंतन

आपल्या गुरुजनांची अत्यंत तळमळीनें, जिव्हाळयानें, श्रद्धापूर्वक अजोड सेवा करून गुरुजनांकडून व इतरांकडून "गुणीदास" ह्या नांवानेंच ओळखले जाणारे, आग्रा घराण्याचे एक अग्रेसर गायक आणि आजच्या पिढींतील अनेक नामवंत गायकांचे गुरु पंडित जगन्नाथ बुवा पुरोहित ह्यांना बारा मार्च रोजीं साठावें संपून एकसष्ठावें वर्ष लागलें त्यावद्दल त्यांचें हार्दिक अभिनंदन.

अपार परिश्रम, विलक्षण जिद्द, दुर्दम्य ईर्प्या ह्यांच्या वळावर, एखाद्या कर्मयोग्याच्या निष्ठेनें अनेक गवयांकडून अत्यंत कुशाग्र बुद्धीनें बुवांनी संगीत विद्या संपादन केली आणि त्या क्षेत्रांत उज्ज्वल यश मिळवलं. हें यशहि त्यांनीं तितक्याच सहजपणें, लीलया पचवलं हें विशेष. आपल्या कर्तृत्वाबद्दल त्यांना आटोकाट स्वाभिमान आहे, पण दुराग्रही अहंकार नाहीं. म्हणून त्यांचा हा कर्मयोग नुसता कर्मठ नसून त्याला माणुसकीचा पोत व अकृत्रिम सहृदयतेची किनार आहे. त्यांच्या बुद्धीपेक्षां त्यांचं हृदय मोठं आहे, शिक्षणापेक्षां संस्कृति मोठी आहे आणि वाणीपेक्षा करणी मोठी आहे. आपल्या विशाल दानतीमुळें संगीत विद्येचं दान ते "अनंत हस्तें" करीत असतां त्यांच्या शिष्यगणांची "कितीं घेशील दों करांनीं" अशी द्विधा मनःस्थिति झाल्यास नवल नाहीं. आजचा तरुण व महत्त्वाकांक्षी कलावंत आपल्या प्रगतीसाठीं बुवांकडून तालीम मिळावी म्हणून प्रयत्न करीत असतो तो त्यासाठींच ! त्यांच्या स्नेहार्द्र अंतःकरणामुळें त्यांच्या शिष्यांना व इतरांनाही त्यांच्यावद्दल नेहमींच सादर, सविनय आपुलकी वाटत आली आहे. त्यांच्याबद्दल विचार करतांना "मुक्या मनानें किती उचळावे शब्दांचे बुडबुडे ?" अशी परिस्थिति होते व त्यांनीच रचलेल्या चिजेंतील एक चरण उत्स्फूर्तपणें ओंठाबाहेर पडतो — "गाऊं गुनन कैसे तुमरो, गुन नाहि मोमे अब....."

त्यांचं भावी आयुष्य म्हणजे झपाटयानें जाणाऱ्या वर्षाचें वाढतें ओझें न वाटतां, त्यांत अडचणींचे तापदायक खटके, काळजीच्या निरुत्साही हरकती न येतां, त्यांच्या जीवनाच्या तंबोऱ्याच्या तारा मस्तपैकीं जुळून राहून, सौख्याचा सूर, स्वास्थ्याचा ताल, आरोग्य व शांति ह्यांची साथसंगत लाभून त्यांच्या जीवनाची मैफल सदैव रंगत रहावी, व "जीवेत् शरदः शतम्" होण्याचें व "कीर्तिरूपें उरावीं" अशीं लोकोत्तर व्यक्ति होण्याचं भाग्य त्यांना लाभावं हीच त्यांच्या षष्ठयब्दीपूर्तीनिमित्त हार्दिक शुभेच्छा.

अनुक्रमणिका

